तेल्हारा टेनिस रीडिंग क्लब संस्थेमार्फत प्र. हो. पुस्तकमाला.

पुस्तक १ लें.



संगीत

Madhava vijaya Natak

# माधव-विजय नाटक.


लेखक,

Joshi, G. G.

गंगाधर गणेश जोशी.



प्रकाशक,

Telhara, Tenis reading club

सेक्रेटरी–टेनिस रीडिंग क्लब–तेल्हारा

यांनीं मुंबई येथें विजय छापखान्यांत छापिलें.

सन १९०५.

1905

किंमत १२ आणे.

-/12/-

[illegible]ल्हारा टेनिस रीडिंग क्लब संस्थेमार्फत प्रसिद्ध होणाऱ्या

## पुस्तकमालेचे उद्देश.

---

१. संस्थेच्या वर्गणीदार मंडळींत लेखन व्यवसाय वाढविणें.

२. वाचनीय अशा राजकीय, सामाजिक, व औद्योगिक विषयांवर पुस्तकें लिहवून पसंत पडतील तीं प्रसिद्ध करणें.

३. संस्थेचीं पुस्तकें विकत घेऊन वाचण्याची ज्यांस ऐपत नाहीं त्यांस तीं फुकट देण्याची होतां होईल तों व्यवस्था करणें.

सदर्हू संस्थेच्या उद्देशानुरूप हल्लींचें हें पहिलें पुस्तक प्रसिद्ध करून समाजासमोर ठेविलें आहे. जगच्चालकाच्या कृपेनें लवकरच मंडळींचें दुसरें पुस्तक बाहेर पडेल, असा संस्थेचा अंदाज आहे. तो जग[illegible] ठरवो.



प्रकाशक.

---



---

## समर्पण.

हें लहानसें पुस्तक

माझे परमपूज्य वडील, ती. रा. रा.

**गणपतराव दादासाहेब जोशी वकील,**

वं चुलते तीर्थस्वरूप रा. रा.

**आण्णासाहेब जोशी,**

या उभयतांस कर्त्यानें अत्यंत

नम्रतेनें समर्पण

केलें असे.

पुस्तक कर्ता.

# दोन शब्द.



"Man the choicest if God's creation endowed with intellect and animation. Should 'tis a pity abuse the Gift. and forfeit pleasures of the highest lift. Many unaware of the Divine Spring that flows through every human being. Allow the same to dry unheeded to enliven which the god intended."

लोकमनोरंजन व्हावें, लोकांचीं मनें अनीतिपासून परावृत्त होऊन नीतीमार्गाकडे वळावीं, आपल्या हितअहिताचा प्रश्न लोकांस समजावा; केवळ स्वार्थसाधू, लबाड व मूर्ख मनुष्याचे संगतीनें सत्ताधारी लोक विषयांध होऊन हरतऱ्हेनें दुसऱ्यांस छळल्यामुळें अंतीं कसे पश्चात्ताप पावतात; आपलेपणासाठीं कितीही संकटें व छळ सोसावा लागला तरी स्वाभिनिष्ठा कायम ठेविल्यानें अखेर सत्याचा कसा विजय होतो, हें लक्षांत यावें या हेतूनें हें पुस्तक मी लिहिलें आहे.

नाटकाचें संविधानक कल्पित तर खरेंच, तथापि यांत नवीन असें कांहीं नाहीं. अलिकडील विद्वान व मान्यवर असे आपुले स्वदेश भक्त जें जें चागलें ह्मणून करतात व बोलतात तेंच यांत सांपडेल. येथें एक मांडलीक संस्थान कल्पिलें असून तेथील लोकांनीं खरी स्वतंत्रता, खरा अभिमान, व आपले हक्क हें कायम राखण्यासाठीं आपणावर आलेल्या संकटाचें निवारण करण्यास योजलेल्या उपायांचें चित्र नाटकरूपानें रेखाटण्याचा यथामती प्रयत्न केला आहे.

या नाटकांतील विषयच असा आहे कीं, तो संगीतापेक्षां प्रोजमध्यें लिहिल्यास विशेष शोभेल, पण अलिकडे लोकांची संगीत नाटकाकडे विशेष प्रवृत्ती असल्यामळें मीही तसें केलें असतां

हें नाटक लिहिण्यांत वर दाखविलेल्या मूळ हेतूंचें विशेष रीतीनें चीज होईल असें वाटल्यावरून निवळ प्रोजमध्यें लिहिण्याचा माझाही कल फिरावा यांत नवल नाहीं. उलट असें न होतें तर मात्र आश्चर्य होतें.

नाटक ह्मटलें ह्मणजे ठराविक सूत्रधार व नटी येऊन नाटकास आरंभ व्हावयाचा, परंतु यांत आह्मीं ठराविक पद्धतीनें आरंभ न करितां कांहीं तरी नवेपणा असावा असें वाटल्यावरून आरंभ थोडासा वेगळ्या तऱ्हेनें केला आहे.

मानवी कृति ही सदोष असावयाचीच. माझी गोष्ट कशाला पण मोठमोठ्या ग्रंथकारांच्या ग्रंथांतही दोष दाखवितां येतील; शिवाय निरनिराळ्या लोकांची रुचि भिन्न भिन्न असते, तेव्हां वरील गोष्टींचा विचार करितां मजसारख्या नवीनच ग्रंथरचना करण्याचा प्रयत्न करणाराच्या कृतींत बरेच दोष असण्याचा संभव आहे. परंतु रसिक व विद्वान वाचक सदय अंतःकरणानें या माझ्या लहानशा पुस्तकाकडे दयार्द्र दृष्टीनें पाहतील अशी मी पूर्ण उमेद बाळगितों.

ह्यांत अशुद्ध बरेंच राहिलें असेल पण त्यांतले त्यांत शक्य व अवश्य तेवढें शुद्धिपत्र पुढें दिलें आहे; तें पाहून पुस्तक वाचण्यास प्रारंभ करावा. याशिवाय कोठें असंबद्धता झाली असेल तिकडे वाचक लक्ष न देतां यांतील गुण घेतील अशी, ज्या जगन्नियंत्यानें माझे मनांत हें नाटक लिहिण्याची प्रेरणा केली त्या परमेश्वराजवळ प्रार्थना करून हे प्रास्ताविक तऱ्हेचे दोन शब्द पुरे करतों.

तेल्हारा—वऱ्हाड.
सन १९०५ इसवी.

पुस्तककर्ता.

# नाटकांतील पात्रें.



| | |
|---|---|
| सूत्रधार ... ... | चालक. |
| आण्णासाहेब ... ... | धारानगरचे संस्थानिक. |
| रमाबाई ... ... | आण्णासाहेबांची पत्नी. |
| माधवराव ... ... | आण्णासाहेबांचे बंधु. |
| कमलाबाई ... ... | माधवरावांच्या पत्नी. |
| शंकरराव ... ... | संस्थानचे कारभारी. |
| नागेशराव ... ... | ,, नवीन कारभारी. |
| वामनराव ... ... | ,, कारकून. |
| शूरसेन ... ... | ,, फौजदार. |
| गणपतराव ... ... | आण्णासाहेबांचे एक नातलग मित्र. |
| विनायकराव ... ... | "स्पष्टवक्ता" वर्तमानपत्राचे एडिटर |
| रामराव ... ... | माधवरावाचे स्नेही ( एक संस्थानिक ) |
| मनोरमा ... ... | शंकररावाची भगिनी. |
| योगी ... ... ... | एक उपदेशक. |
| वारांगना ... ... ... | गाणारीण. |
| बळवंतराव, भास्करराव<br>गोविंदराव, त्रिभुवनशेट<br>देशमुख व इतर मंडळी. | शहरांतील सद्गृहस्थ. |

शिवाय शिपाई वगैरे फिरकोळ.

# शुद्धिपत्र.



| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| ३ | ५ | आहे. | आहें. |
| ७ | २० | होय. | होय. |
| ९ | २५ | पांहू | पाहूं |
| ११ | २१ | या | याला |
| १३ | १ | हें पाहून | पाहून |
| ३३ | ९ | करण्यांत | करण्यांत, |
| ३३ | ११ | वरिष्ठाकडे | वरिष्ठाकडे |
| ३६ | *४ | नटळें | न टळे |
| ४४ | १६ | लोकांचा | लोकांच्या |
| ४४ | १९ | बुद्धि | बुद्धि- |
| ५२ | २२ | तरू | उरू |
| ६३ | २० | अपला | आपला |
| ७५ | १४ | सद्वेत् | सद्वेतू |
| ७६ | १० | हलणार, नाहीं | हलणार नाहीं, |
| ७६ | १४ | विश्वास बसणार | अविश्वास बसणार, |
| ८० | १ | ससजलीस ! | समजलीस ! |



संगीत

# माधव--विजय नाटक.

## अंक १ ला.




### प्रवेश १ ला.

( स्थळ-रंगभूमि. )

सूत्रधार

पद ( चाल—पंचतुंड नररुंड. )

दिगंबरा हे हर भवचिंता पावन करि मज हे विमला ॥
भवाब्धिमाजी भार वाहतां जीव खचितची हा श्रमला ॥
सच्चिद्धन सुख आनंदकंदाव्ययरूपात्मक जगिं भरला ॥
चराचरहि हें सर्व व्यापुनी दशांगुलें जो परि उरला ॥ १ ॥
मुनिजनमानसहंस सखा हा भक्तार्थी हर अवतरला ॥
जगदुद्धारक अनुसूयात्मज मायारूपें अनुसरला ॥ २ ॥
सदसद्बुद्धीदायक प्रभुजी प्रार्थितसे त्वत्पदकमलां ॥
नवरस कवनीं स्फूर्ती देई गणेशात्मज दासाला ॥ ३ ॥

पद ( चाल—रामसखा बनि. )

नमितों गजवदनाला । देत असे जो विमल यशाला ॥ धृ० ॥
कार्यारंभीं नमितां ज्यातें घोरहि विघ्नें नेइ लयातें ॥
सुरगण वंदिति ज्याला । भक्तां देई कमनीय शाला ॥ १ ॥
नारद तुंबर गायन करुनी । ध्याती तुजला सन्मति धरुनी ॥
नमितों पदपद्माला । नेई मजसी मोक्षपदाला ॥ २ ॥

पद ( चाल-रजनिनाथ हा. )

आर्पितसे मी ही कुसुमांजली । श्रीमच्छिवपद्पंकज युगुलीं॥धृ॥
चिंतुनि चित्तीं विघ्नहराला । प्रार्थितसे दे सन्मति मजला ॥
जाणुनिया तव अगाध महिमा । साह्य मागतों दुष्करकर्मा ॥
अर्पी तुजही नव कवनावली । श्रीमच्छिवपद्पंकजयुगुलीं ॥

( प्रेक्षकांकडे पाहून ) बरें असो. सद्गृहस्थ हो, आपले इच्छित हेतु पूर्ण करण्या ऐवजीं व्यर्थ वेळ घेतला याबद्दल क्षमा मागून विनंति करितों कीं—

साकी.

जनहित पूरित सुदक्ष माधव याच्या नूतन कथना ॥
लक्ष देउनी श्रवण कराया प्रार्थितसें सुजनांना ॥
उत्कंठें जमले ॥ परि मान्य करा झालें ॥ १ ॥

( दुइंगकडे पाहून ) पण अशा वेळीं माझे प्रियमित्र शंकरराव कां बरें इकडे येत असावेत ? ( शंकरराव येतात ).

**शंकरराव**—शाबास बळवंतराव ! नीति नीति ह्मणून रात्रंदिवस ओरडणारे, लोकांस उपदेश सांगण्याचा आव घालणारे, स्वतःस नीतीचें आगर समजणारे व धर्माचे नांवानें रात्रंदिवस टाहो फोडणारे तुह्मीचना ? त्याच प्रमाणें आपली सुधारणा करा, धर्माची अवहेलना करूं नका, वाईट मार्गाकडे जाऊं नका वगैरे प्रकारच्या वाता झोंकणारे हे तुह्मीच. मग नाटक करणें ही अनीति नाहीं काय ? नाटकाची निवळ मौज पाहण्यासाठीं तुह्मी आला नसून रंगभूमीवर स्वतः प्रयोग करून दाखविण्याचा--नव्हे--स्वतः नाचून दुसऱ्याचे मनावर ठसा उमटवून देण्याचा तुमचा विचार दिसतो, हें तुमचें कृत्य अति लांछनास्पद, दूषणीय व

निंदास्पद असून या बद्दल लोकांकडून किती वाईट आरोप तुह्मावर होतील याचा थोडा तरी विचार केलात काय ?

**सूत्रधार**—हें पहा, रंगभूमीवर प्रयोग करून दाखविण्याचा माझा विचार दिसतो असें संदिग्ध कां बोलतां ? मी तर या नाटकांतील सूत्रधार आहे.

**शंकरराव**—ठीक, सूत्रधार महाराज. तुह्मी चांगले दिवे लावणार ह्मणावयाचे मग ! अहो, तुह्मावर माझा विशेष लोभ, तुह्मी माझे परम स्नेही व तुमचे बद्दल मला विशेष आदर ह्मणूनच एवढी काळजी बाळगावयाची व याचसाठीं हे अशा प्रकारचे चाळे नकरण्याबद्दल तुह्मास सांगण्याचें पुष्कळ वेळां मनांत आलें, तथापि आजपर्यंत मी तिकडे विशेष लक्ष दिलें नव्हतें. तुम्ही सुज्ञ आहांत, मग नाटकासारख्या वाईट छंदाकडे लक्ष लावतां याबद्दल राहून राहून खेद उत्पन्न होतो. आजपर्यंत मिळविलेली कीर्ति सर्व लयास जाईल याचा कांहीं विचार करा. उद्यां लोक मलाहि तुमचे संगतीमुळें नांवें ठेवूं लागतील. चला, द्या सोडून हा नाद. कां ! विचार नाहीं लक्षांत येत ? बस ! पुरे ! आतां तुम्ही हा नाद सोडीपर्यंत मला तुमचा संपर्कहि नको.

( जाऊं लागतो. )

**सूत्रधार**—( त्यास धरून ) नाटकासंबंधानें तुमचे असे घाणेरडे उद्गार निघावेत ही फार आश्चर्याची गोष्ट होय. माझी अशी पक्की खात्री आहे कीं, याबद्दल तुम्ही जरा पोक्तपणानें, शांत पणानें व सदसद्विवेकबुद्धि जागृत ठेवून विचार केलात तर तुमचें मत आपोआप बदलेल. करमणुकीच्या मार्गापैकीं नाटक हें आज काल मुख्य स्थान मानिलें जातें. नाटका पासून लोकांचें मनोरंजन होतें. लोकमनोरंजनाच्या

ज्या ज्या ह्मणून गोष्टी असतील, जे जे मार्ग असतील ते ते सर्व लोकांत अवश्य प्रचलित झालेच पाहिजेत. पण तसें करितांना त्यांजपासून मनावर किंवा शरिरावर कांहीं वाईट परिणाम मात्र होण्या सारखे आहेत कीं काय याबद्दल खबरदारी ठेवावी, मन हें अति चंचल आहे, फार अस्थिर आहे, मूढ आहे व अति नीचही आहे; त्यास रिकामपण मुळींच देतां कामा नये. रिकामपणीं चांगल्या कर्मणुकी काढल्या नाहींत तर मनाची प्रवृत्ति दुर्गुणाकडे होणारच-

**शंकरराव**-तुम्ही ह्मणतां त्याप्रमाणें मनाची स्थिति व धर्म असतील, परंतु नाटक पाहण्याशीं याचा संबंध कसा जुळतो हें मात्र समजत नाहीं. नाटक करणें व पाहणें यापासून तुम्हाला तो काय फायदा ?

**सूत्रधार**-फायदा काय लहान आहे !

पद ( चाल-उद्यां वध जाते. )

**गडया बहु आहे ॥ मनरंजन कीं ते राहे ॥ धृ० ॥**
**मन भारी हें चंचल पाहे ॥ तैसें अस्थिर बहु नीचहि हें ॥**
**दुर्गुणी न तें होण्या बा हें ॥ महौषध आहे ॥**
**जनिं भाषारुचिही राहे ॥ १ ॥**

**शंकरराव**-मनुष्यमात्रांची जात्याच धांव अगर नैसर्गिक धर्म किंवा स्वभाव ह्मणा नेहमीं दुसऱ्यांचें अनुकरण करणें हा होय; मग जे प्रयोग, जे हावभाव, जें आचरण अति-अश्लील रीतीनें रंगभूमीवर दाखविलें जातें त्याचा परिणाम लोकांचे मनावर होऊन समाजाचे पदरांत अनीति टाकल्याचा दोष तुमचे मतें नाटककर्त्यावर नाहीं काय ?

**सूत्रधार**--तुह्मी बरोबर विचारलेंत. मी कबूल करितों कीं, लहान वयांत मन हें कोंवळें असतें त्यामुळें त्यावर जो प्रथमतः ठसा उमटतो तो दृढ होऊन बहुधा कायमचाच होतो. सबब अश्लील प्रयोग तरुण मंडळीस सर्वथा त्याज्य होत. आपल्यांत चांगलीं नाटकें नाहींत असा तुमचा समज आहे काय ? माझ्या मतें तर लोकांत अभिरुचि उत्पन्न होण्यास, हर एकांस आपल्या कर्तव्याची दिशा समजण्यास, आपल्या प्राचीन स्थितीचें ज्ञान होण्यास, व त्याच प्रमाणें आपल्या पूर्वकालिन पूर्वजांचीं कृत्यें समाजासमोर दृग्गोचर होण्यास उत्तम उत्तम नाटकांचे प्रयोग अवलोकन करणें या पेक्षां दुसरें चांगलें साधन क्वचितच सांपडेल.

**शंकरराव**-काय ! तुह्मी ह्मणतां असें आहे, तर मग आपलेंहि नाटक अशाच प्रकारचें असेल नाहीं बरें ?

**सूत्रधार**--आज काल कोणत्याही ठिकाणीं पहा, नाटका संबंधानें लोकमत अनकूलसें दिसत आहे. ह्मणून माझा व तुमचा मागें ज्या विषया संबंधानें संवाद झाला तोच विषय नाटक रुपानें रंग भूमीवर करुन दाखविला असतां इतर साधनांपेक्षां यानेंच लोकांच्या मनावर जास्त लौकर ठसा उमटेल, असें वाटल्या वरुन माधव-विजय नांवाचें नूतन नाटक करुन दाखविण्याचें मनांत आणिलें आहे.

**शंकरराव**--एकूण जनहितासाठीं लोकापवादाची पर्वा न ठेवण्याची, हर प्रयत्नानें झटण्याची व स्वतः झीज सोसण्याची आपली उत्कट इच्छा पाहून मनाला बहुत समाधान वाटतें. हा काल पर्यंत त्रास देऊन आपला वेळ मी व्यर्थ घेतला या बद्दल वाईट वाटतें,

सूत्रधार-एका महत्वाचे प्रश्नाचा निकाल लागला तेव्हां यांत वेळ गेल्या बद्दल वाईट वाटण्याचें कारण नाहीं.

शंकरराव—ठीक आहे. माझेंहि कर्तव्य तुम्हांस मदत करण्याचें आहे. चला आपल्या उद्योगास लागूं. ( जातात. )

---

## प्रवेश २ रा.

( स्थळ-माधवरावाचा वाडा. )

माधवराव—

पद ( चाल-प्रभु मज छंद तुझाचि. )

अहाहा, हाय असे प्रिय तात ॥ धृ० ॥ ज्ञानामृत जें आपण दिधलें ॥ परि वांया हो जात ॥ प्रजा पाळिली सकलहि प्रेमें॥ नीति धरुनि हृदयांत ॥ नाना संस्था स्थापन करुनी ॥ कीर्ति वरिलि जगतांत ॥ गमतें मजला दुर्दैवानें ॥ जाइल विलया तात ॥ १ ॥

लोकहो ! तुमचे सौख्याचे दिवस बाबासाहेबांबरोबरच गेले. त्यांच्या मागें आण्णासाहेबांकडून न्याय, नीति व प्रजापालन कितपत चांगलें होणार आहे हें दिसतेंच आहे. कारण—

पद ( चाल-बघुनि उपवना. )

दु:संगति नच कधिंही बरवी जगतिं कुलिन थोरा ॥ हीनतेला पावऊन परि दीन करित्त शूरा ॥ धृ०॥ अमूल्य रत्नास्पर्श जाहल्यावरीं मत्कुणाचा ॥ दुभंग होउनी कांतिहीन तो होत असे साचा ॥ काक संगमीं हंस बैसतां नाशचि बुद्धीचा ॥ होय सुजनही दु:संगतिनें मूढमती साचा ॥ चाल ॥

हा मत्बंधु कधीं तरि दु:संगति सोडिल ॥ त्या वाडवडीलां हर्ष कधीं जोडिल ॥ या दुष्कीर्तीतें केव्हां तरि तोडिल ॥ ऐसी चिंता जाळित माझ्या खचिताचि हृदयांतरा ॥ काय करूं मी कांहिं सुचेना झालों मी बावरा ॥ १ ॥

कालचक्राच्या भयंकर फेन्यांत दुर्दैवानें आमचा देश सांपडून अनावृष्टीमुळें सर्वत्र आक्रोश माजला आहे ! त्याचे कसे हाल हाल चालले आहेत ! अन्नान्नदशेमुळें गोरगरिबांच्या शरिरांचे कसे सांपळे बनले आहेत व प्रत्यही त्या मुळें किती तरी दुर्दैवी प्राणी पटापट प्राण सोडीत आहेत. त्यांची अशी दैन्यावस्था स्वतः डोळ्यांनीं पाहणें अति खेदजनक होय. अशा वेळीं त्यांना मदत करणें एकीकडेसच राहिलें. उलट त्यांची पर्वाही न ठेवतां आमच्या पराक्रमाचा अंमल दीन दुबळ्या प्रजेवर बसविण्यासाठीं, स्वतःचे सर्व मनोरथ साध्य होण्यासाठीं, स्वतःचा तळिराम गार करण्यासाठीं, स्वतःची तुमडी परिपूर्ण भरण्यासाठीं, ईश्वरनिर्मित वस्तू म्हणजे-गवत, कंद, मुळें, हीं देखील निवळ पोटाची खांच भरण्यासाठीं मोफत आणण्याची मनाई करुन आणणारांपासून आम्ही कर वसूल करीत आहों हा किती तरी अधमपणा होय. या सर्व दुष्ट कृत्यांस व अंदाधुंदीच्या साम्राज्यास कारण कोण म्हणाल तर तो दुष्ट नागेशरावच होय--राजे व प्रजा यांत नेहमीं प्रीतीचा पूर वाहत असला पाहिजे. प्रेम म्हणजे जी काय वस्तु आहे ती उभयतांनीं आपल्या कृतींनीं निदर्शनास आणिली पाहिजे. राजा-म्हटला म्हणजे आपल्या मातापित्या-प्रमाणेंच प्रजेला वाटला पाहिजे. उलटपक्षीं असें वाटण्यास राजाचें वर्तन अत्यंत शुद्ध व विचारशील राहिलें पाहिजे. चांगला राजा म्हणवून घेण्यास कोण व कसे योग्य होतात, ते पहा--

पद (चाल-झंपा, प्रबंध.)

भूपती कोणते पितृसम वाटती ॥ धृ० ॥ आत्मभावें प्रजा पाळिताती ॥ संकटीं पाहुनी प्रेमजल सिंचिती ॥ रक्षिती नुमजुनी भेद चित्तीं ॥१॥ पिता पुत्र नातें सदां भासवीती ॥ कष्टिजन पाहुनी तुष्टवीती ॥ २ ॥

त्या दुष्ट, नीच व हरामखोर नागेशाच्या संगतीनें गेल्या चार महिन्यांत आमच्या आण्णासाहेबांच्या वित्ताचा, शरीराचा व अब्रूचा किती खराबा झाला आहे ह्मणून सांगूं ? नागेशराव ह्मणजे राक्षस, निवळ कर्दन काळ; असले लोक ह्मणजे दुसऱ्यांस होत असलेलें दुःख पाहून आनंद मानणारे, दुसऱ्यांच्या अवनतीवर हे आपली उन्नती समजणारे, दुसऱ्यांचे पैशावर आपला हक्क सांगणारे, स्वतःस वैभवाचे उच्चतम शिखरावर जाण्याच्या निंद्य हांवेमुळें दुसऱ्यास अति खोल अशा दुःखमय सागरांत लोटणारे आहेत. गरीब बिचाऱ्या मुंग्यांचीं वारुळें ह्मणजे नागराज जशीं आपलीं हक्काचीं सदनें समजतात तद्वतच ह्या लोकांचें वर्तन, अत्यंत नीच व पशुतुल्य असतें. या बद्दल दादांस सांगेन ह्मटलें तर, माझा अगदीं नाइलाज; आजपर्यंत या बद्दल बरेच वेळ चर्चा केली, पण फुकट; खाजगीकडे माझी नजर आहे तों पर्यंत तेथील स्थिति नीट आहे व राहील ही. पण जर कां राजश्रींनें माझे विरुद्ध आण्णासाहेबांकडे व्यर्थ कांगावा आरंभिला तर सध्याच्या स्थितीवरून पाहिलें असतां ते त्यांचें ऐकणार हें खास. मग त्या बांधलेल्या पाण्यास उपसण्यास तो कितीसा वेळ लागणार ? कांहीं नाहीं तरी माझ्या अंदाजानें बाहेरून वसूल झालेल्या--नव्हे-जुलमानें काढलेल्या पैशांपैकीं निदान तीस हजारांची रक्कम त्याणें आपले घरीं लांबविली असावी.

पण अशी स्थिति चालणार किती दिवस; तात्पर्य--चोहों बाजूंनें विचार करितां पुढें उद्भवणारे भयंकर परिणाम डोळ्यां समोर चित्राप्रमाणें उभे राहून कांहीं वेळ सुचेनासें होतें. मी म्हणतों येथून निघून जावें म्हणजे ही अपकीर्ति तरी ऐकण्यास नको पण जर मी--

पद (चाल–नच सुंदरि करि कोपा.)

ऐसा सल्ला ठरवीतों ॥ योग्य असे कां मज तो ॥
राया सोडुनि जाण्याचाही निश्चय जरि करितों ॥ धृ० ॥
मजविण त्या काय गति ॥ येतें हें बहु चित्तीं ॥
लोकांतें आवरुनी ॥ धीर धरीतों स्वमनीं ॥
बंधूतें तिळ सुख ना ॥ सोडुनि जरि मी जातों ॥ १ ॥

तेव्हां माझ्या मागें दोन आठवडेही आण्णासाहेबांला येथें चांगल्या तऱ्हेनें निभावतील असें दिसत नाहीं. मीच ह्मणून आजवर लोकांस समजावून धरिलें आहे. यदा कदाचित् ही वावु प्रजेनें वरिष्ठापर्यंत नेऊन धडकाविली तर तेव्हांच यांची उचलबांगडी होईल. आजपर्यंत सरकारकृपेनें मिळविलेला मान, मोठेपणा व कीर्ति हीं जर आम्हीं गमाविलीं तर वडिलांचे पोटीं जन्म घेऊन आमचा उपयोग हाच व्हावा काय ? ह्मणून या वेळीं न जाणें हेंच श्रेयस्कर होणार आहे. आम्हीं आपले तंटे आपसांत न मिटविले तर पशूंत व आमच्यांत अंतर तें काय ? आण्णासाहेब हे चांगले शिकलेले आहेत पण त्यांना नागेशरावानें अतिच मोहून टाकिलें आहे. स्वतः आपण आणि प्रजा यांमध्यें परस्परांशीं संबंध आणि अधिकार कसे असावेत वगैरे महत्वाचे प्रश्नाचा बराच भाग त्यांस अगम्य आहे, असें म्हणणें भाग पडतें. असो. एक वेळ सांगून पांहू--जावेंच आतां. ( जातो )

## प्रवेश ३ रा.



( स्थळ—नागेशरावाचा वाडा. )

नागेशराव—

पद्य (चाल—शिव छत्रपती भूपतिवरती.)

खरचुनि माझी अक्कल सर्वहि त्या विजयश्रीतें ॥ मिळवुं पाहतों परिमज दुर्घट बहुतचि कीं गमतें ॥ ध्रु० ॥ भलभलतीं तीं कृत्यें साहस केलीं बहु हातें ॥ युक्ति योजुनी निःसंशय हो मिळविन मी यश तें ॥ १ ॥

ईश कृपेनें तर खरेंच, पण माझ्या अचाट बुद्धिकौशल्यानें, उद्योगानें, साहसानें व फसवेगिरीच्या कलानैपुण्यानें हा बेलपर्यंत सर्व गोष्टी उत्तम जुळून येण्याचा संभव दिसत आहे. नाहीं तर हे राजश्री दुसऱ्यांस कां दाद देणार होते. स्वतःचे हेतू साधण्यासाठीं वाटेल त्या बाता ठोकल्या, हवी तितकी उलाढाल केली, असह्य अपमानानें शेंकडों जणांचीं मनें करपवूनें सोडलीं. निरुद्योगी लोकांस, आळशी वनविणाऱ्यांस, अन्नछत्र व धर्मादाय खाल्यास अजीबात रजा देवविली, राज्यांतील निरुपयोगी तमाम उद्योगशाळा व कलाभुवनें बंद करून खर्चाच्या बाबी कमी केल्या. रिकामटेकड्या सरदार लोकांस चालूं असलेल्या नेमणुका बंद पाडल्या, दुष्काळामुळें अशक्त झालेल्या लोकांकडून कामें बरोबर होत नसल्यानें तीं बंद करविलीं. यंदा नापीक झाल्यामुळें संस्थानांतील इतर वसूल बाबींमध्यें पडणारी तूट जंगलांतील किरकोळ पदार्थांवर कर बसवून भरून काढण्याची सुरवात केली; अशा रीतीनें स्वतःची पैशाच्या बाबतींत चैन साधण्यासाठीं

वाटेल तशा सल्ला दिल्या, नीच कर्मे केलीं; नाहीं नाहीं तीं कारस्थानें अण्णासाहेबांचे गळीं उतरविलीं; सर्वांचीं तोंडें बंद करून स्वतःचा अंमल अव्याहत चालू केला; ऐष आरामांत लाखों रुपयांचा फन्ना उडवून स्वतःची तुमडी परिपूर्ण भरली व आजपर्यंत चैन व करमणूकही मनसोक्त साधली. शंकररावा-संबंधानें आण्णासाहेबांचें मन कलुषित करून त्यांचा अप-मान करावा व त्यांस दरबारांत येण्यास सक्त मनाई कोणत्या उपायानें होईल याचा मी आज किती तरी दिवस विचार करीत आहें. त्याच प्रमाणें माधवरात्र--प्रत्यक्ष आण्णासाहेबांचे बंधु--यांचीहि व्यवस्था करणें भाग आहे. माझीं सर्व कारस्थानें सुरळीत पार पडण्यास हें कार्य जितकें अधिक लवकर घडून येईल तितकें चांगलें होणार आहे. तेही पक्के बिलंद व धूर्त आहेत. नाहीं तर मी त्यांस केव्हांच लांब फेंकलें असतें. त्यांस स्थानच्युत करण्याचा माझा बेत आज मी पार पाड-णार; मग पाहतों त्यांचा दिमाख कितपत कसास उत-रतो तो. या माझ्या युक्तीबद्दल व शहाणपणाबद्दल त्यांस देखील माझी तारीफ करावी लागेल. असो, तूर्त याचा विचार नको. काल ठरविल्याप्रमाणें वामनराव यांनीं सर्व व्यवस्था केलीच असेल, तेव्हां आज शंकरराव व माधवराव यांस फजित करून घरीं बसविलें म्हणजे मग या संस्थानचा मुख्य कारभारी कोण ? अर्थात् या योग्य कायते आम्हींच. कारभारी झाल्यानंतर सर्व अधिकार हातांत राहतील, सत्ता येईल, कीर्ति मिळेल, वचक बसेल व मज्जाव कोठेंच उरणार नाहीं. मग ज्या सुंदरीवर फार दिवसांपासून माझें मन आहे व जिच्या साठीं आजपर्यंत इच्छा धरून हे सर्व उद्योग खटा-टोप, प्रयत्न व साहस कुल्यें केलीं तिचें दर्शनसौख्य तर

सध्यां मिळण्यास हरकत नाहीं. युक्तिप्रयुक्तींनें आपली मनिषा तृप्त करून घेण्याचे प्रयत्नास लागूं. आज हाच दिवस दिसावयास मजला काय काय करावें लागलें आहे हें माझें मलाच माहित !

पद ( चाल—संतति साठीं वरचेवर कां. )

पाडुनि परिचय संगति धरुनी बनलों झटकन राव कसा॥
अचाट माझी बुद्धि खर्चुनी झालों विजयी सिंव्ह जसा॥धृ०॥
सल्ला ठरवुनि त्यांच्या नांवें केला गिल्ला अचुक कसा ॥
पदच्यूतही करुनी त्यांना बनतों चैनी आजि असा ॥
॥ चाल ॥ होईन मी सुखी खरा जगतितलांत ॥
धन्य मजसी नारीनर ह्मणतील मनांत ॥ त्या कार्याचा
व्यूह रचाया व्याध जाहलों निश्चितसा ॥ १ ॥

चलातर अगोदर तिकडेसच जावें. ( जातो. )

## प्रवेश ४ था.

( स्थळ-दरबार हॉल. )

**आण्णासाहेब**—शंकरराव, जरा बेतानें बोला. माझा कारभार पाहणारा मी खंबीर बसलों आहे; तुम्हांस ज्यास्त बोलण्याची जरूर नाहीं. तुम्ही ह्मातारे झालांत, जुने नोकर आहांत, ह्मणून आजवर रजा दिली नाहीं. सांगितलेलें काम करावें व पगार खावा, तें करण्याचें सोडून रिकाम्या उठाठेवीची काय गरज ? संस्थानांतील प्रजेस कां ह्मणून तुम्हीं विनाकारण त्रास देतां; बऱ्याच तक्रारी तुम्हाविरुद्ध मजकडे आल्या आहेत. तेव्हां या बद्दलचा विचार जरूर केलाच पाहिजे. त्याच प्रमाणें माधवरावाच्या पोरस्वभावामुळें त्याजकडून निष्काळजीपणाचा बेपर्वाईचा व उद्दामपणाचा प्रकार वारंवार घडून येतो; हें

हें पाहून धास्ती वाटते.

शंकर०–महाराज, जेथें विचारास फांटा मिळालेला आहे, खऱ्याखोट्याचा निर्णय नाहीं, प्रामाणिकपणाची चाड नाहीं, सत्याचा अभाव असतो, हांजी हांजीचें प्रस्थ माजलेलें आहे, अशा ठिकाणीं माझीहि राहण्याची इच्छा नाहीं. मी दुष्काळ-ग्रस्तांस मदत केली, धान्य वाटलें, त्यांचेसाठीं कामें काढिलीं हीच जर माझे हातून चूक झाली असें समजत असाल, तर इलाज नाहीं. विचार करा कीं, हल्लीं आपण कामें बंद करून लोकांची मदत काढून घेतलीत, पण अशामुळें उपासमार होऊन ते यमसदनीं गेल्यानंतर आपण राज्य तरी कोणावर करणार ? प्रजा आहे ह्मणूनच राजाचा मान आहे, प्रजा नाहीं तर राजा कोणीच नाहीं. आपण व्यर्थ मतलबी लोकांचे नादानें आपले अपकीर्तीस कारण करून घेत आहांत. आपलेजवळ पैसा आहे व अधिकार आहे, तों पर्यंतच हे लोक चैन मारण्यास तयार राहतील; पण प्रसंगीं यांपैकीं कोणीही उपयोगी पडणार नाहीं.

आण्णासा०–सर्व गोष्टींचा विचार करूनच मी करीत आहें. तुमचेकडील सर्व काम नागेशरावचे स्वाधीन करा. ही जोखीम शिरावर संभाळण्यास कांहीं जास्त अक्कल लागत असते, समजलांत ? वामनराव, तुह्मीही माधवाजवळील सर्व कागदपत्र पाहून करा बाकी वसूल.

शंकर०–स्वार्थसाधु, लबाड व मूर्ख मनुष्याच्या वचनावर भरंवसा ठेवून आपण मला दोषी ठरविलेंत, हें फार गैर आहे. अहो, नागेशराव सारख्या प्रिय भाषणी, स्वार्थसाधू व निंदक गृहस्थाचे हातीं कारभार देण्यापेक्षां, एखाद्या अज्ञानीच कां होईना–पण विश्वासू मनुष्याचे हातांत दिला तरी ठीक होईल. अहो, नागेशराव ह्मणजे–

( दिंडी )

दुष्ट बुद्धीचा तोचि असे नीच ॥
तुह्मा लाविल तो अंतिं काळजीच ॥
नीति मार्गानें प्रजा ही पहावी ॥
हीच काया त्या कीर्तिसी वहावी ॥

ह्मणून ह्मणतों. अझून विचार करा; जागे व्हा. मी तर आतां चाललोंच. आपणापुढें बोलण्याचा जरी माझा अधिकार नाहीं, तथापि महाराज--

( दिंडी )

असत्याची ती मजसि असे चीड ॥
ह्मणुनि कथितों ती स्पष्ट त्यजुनि भीड ॥
दुष्ट संगति ही फार पहा नाडी ॥
सोडि त्याला सन्मार्ग सदा जोडी ॥

योग्य असेल तेंच मी सांगणार. (निघून जातो.)

**माधवराव**--आत्तांचा हा शंकरराव संबंधानें घडलेला प्रकार गैर नव्हे काय आण्णासाहेब ? जुन्या इमानी कारभाऱ्यास त्याचे उतार वयांत असा प्रसंग यावा ना ? त्यांचा मोठासा दोष असेलसें मला नाहीं वाटत. मजसंबंधानें ह्मणाल, तर मी आपल्या आज्ञेबाहेर नाहीं. पण मी जें जें करीत आहें तें तें विचारानें, न्यायानें, सचोटीनें व वडील बाबासाहेब यांहीं घालून ठेवलेल्या जुन्या वहिवाटीप्रमाणें करीत आहें. यंदा नापीक झाल्यामुळें सान्याबद्दल कुळांवर सक्ती केली नाहीं. त्यांचेकडील आपला पैसा बुडणार कां आहे ? यंदा नाहीं तर पुढें वसूल होईलच ! आज जर त्यांचे जवळ एकवेळपुरतेंहि धान्य खाण्यास असेल

किंवा नाहीं याची शंका आहे, तर त्यांनीं वसूल तरी कशाचे आधारावर द्यावा ? जुलमाअंतीं चीजवस्त मोडून देतील, नाहीं असें नाहीं; परंतु ज्यांचे जिवावर आपण एवढी चैन भोगतों, [illegible] व उदार बुद्धि न ठेवणें लाजिरवाणें नाहीं का होणार ? अहो, जर आपण—

पद ( चाल–नाहीं सुभद्रा० )

दुष्काळांतुनि, प्राण प्रजेचे, वांचविले आतां ॥
सव्याज समजा, येई निघोनी, निःसंशय हातां ॥धृ०॥
संकटिं त्यांच्या, प्रेमदृष्टि ती, ठेवि सदा हृदयीं ॥
बंधुश्रेष्ठा, स्वकर्म आहे, पडणें उपयोगी ॥
कीर्ती तुमची, या न्यायानें, होइल जी गाजी ॥
कल्पांतानें, शिणलें बहु हो, काय गती आतां ॥ १ ॥

आण्णा०–आपल्याप्रमाणें दुसरीकडे नापीक झालें नाहीं काय ? आपणच कुळांचें काय कर्ज घेतलें आहे ? आपला पैसा वसूल करण्याचें तुझें काम होतें. वामनराव यांस दिलेला हुकूम अगदीं बरोबर आहे. वामनराव ! माधवा जवळील सर्व कागद पत्र घ्या पाहून. चला जा.

माध०–आपण विचार करीत नाहीं त्यास काय ह्मणणार ? श्रीमंतांस सर्व कांहीं शोभतें व अधिकाराचे जोरावर सर्व कांहीं घडून येतें असा असलेला भ्रम जरा दूर करा. माझें ह्मणणें आपणांस जास्त फाजीलपणाचें वाटणार आहे, पण जें काय करणें तें नीतीस अनुसरून, सत्यास स्मरून, अधिकारास जाणून व योग्यायोग्य विचार करूनच करा. इतकें सांगून मी आपली रजा घेतों. ( माधवराव व वामनराव जातात )

**आण्णा०**–कां नागेशराव ! झालेंना तुमच्या मनाप्रमाणें ?

**नागेश०**–( स्वगत ) माझी इच्छा ह्मणजे झालें हें कांहींच नाहीं. ( उघड ) आपली कृपा झाल्यावर सर्व कांहीं होणार आहे.

**आण्णा०**–तें असो, पण आतां रात्र बरीच झाल्यामुळें झोंपेची वेळ टळून गेली आहे, तर कांहीं करमणूक आणाल तर बहार उडेल, नाहीं बरें ?

**नागेश०**–या शांत वेळीं कर्मणुकीसाठीं एखादें नाजूकच माणूस पाहिजे. येथील बहुतेक ठळक ठळक पात्रें तावडींतून गेलीं आहेत. नाहीं ह्मणावयास एक राहिलें आहे, पण तें महत् प्रयासाचें–बहुतेक असाध्यच––

**आण्णा०**–तें कांहीं मी ऐकत नाहीं. तुमच्या ह्मणण्याप्रमाणें सर्व व्यवस्था आतां केली आहे. काल कबूल केल्याप्रमाणें घेऊन याच. तिला पाहिल्यापासून मला तंर असें झालें आहे कीं–

पद ( चाल–झाली ज्याची० )

गजगामिनि ती सुंदर वदना ॥
सस्मित मुखि हो किति मृगनयना ॥ धृ० ॥
प्रथम देखिल्यापासुनि नयनीं ॥
होई कीं वश ध्यास मन्मना ॥ १ ॥
कांहिं सुचेना मज दिन रजनीं ॥
अंध मि झालों कांहीं रुचेना ॥ २ ॥

आणि तेव्हांपासून तर मित्रा मला––

पद ( चाल–गांजितां मला कां नाथा. )

होय कां वश सखी अबला ॥ जाळी ॥ चिंता ॥
हृदयीं ॥ मजला ॥ धृ० ॥ कांहिं दिसेना ॥

झोंप मिळेना ॥ कपटाच्या करुं कृतिला ॥ १ ॥
निराश होतों वाटे मजला ॥ जिव मम बहु भ्रमला ॥ २ ॥

नागे०—ती आपणास वश व्हावी, ह्मणून मी आपली वाटेल तितकी खटपट केली पण व्यर्थ; तथापि आपण निराश होण्याचें कारण नाहीं. हर प्रयत्नानें आपली कार्यसिद्धि होईल असें करीन. दुसरें चार दिवसांपासून एक सुरेख पांखरू शहरांत आलें आहे. गाण्यांत तर प्रविणता बरीच आहे ह्मणतात. आपण तिजला पाहण्याबरोबरच बालंबाल खूप होऊन जाल. येण्याबद्दल तिजला सूचना पाठविली असून इतक्यांत येईलहि. सुंदर पण सुंदर कांहीं विचारूंच नका. सुचवून ठेवतों, पैसा मात्र घेतानेंच काढा हो; नाहींतर सुटाल आपले देतच. आपणास अशावेळीं सुमार राहत नाहीं ह्मणून सुचविलें.

( बारांगनेस खालीं आलेली पाहून )

आण्णा०—नागेशराव ! आज खूप कमाल केलीत बुवा. याला ह्मणावें काम; जा आणा तिला वर.

नागे०—ठीक आहे. ( उठून, बारांगने जवळ खालीं जाऊन तिला ह्मणतो. ) मी आपल्या स्वतःच्या शिफारशीनें तुझी सोय लावली आहे, तर ठरल्याप्रमाणें प्राप्तींतील निम्मे मला मिळाले पाहिजेत, समजलीस ?

बारांग०—( एकीकडे ) मेल्याच्या नीचपणास कांहींतरी सीमा आहे कां ! ( उघड ) निवळ असेंच नका करूं; चवथा हिस्सा घ्या.

नागेश०—तें मी कांहींएक ऐकणार नाहीं. पन्नास पर्यंत देवविले तर चौथाई आणि वर देवविले तर निंमेच घेईन. चल ये अशी वर. ( तिला वर घेऊन जातो. ) हं चालूं दे.

वारांगना-

पद (चाल-रुचतों कां०)

जगतीं या योग्य नामी, लाल किती दीसती ॥
दीनांची सोय जे हो प्रेमानें ठेविती ॥
गौरव हा करिति मोठा ह्मणुनी ते वर्णिती ॥
ऐकुनिया राहु वाटे सेवाया मूर्ति ती ॥ १ ॥

नागे०-वाहवा! खरी गोष्ट.

वारांगना-

पद ( चाल-आवो आवो रंगेला. )

तुह्मा ईश करो जगतिं भाग्यशाली ॥
जगांतरीं विमल सुयश असो नित्य झाली ॥ धृ० ॥
नसे वीर तुह्माविण सत्य अंतरालीं ॥
शांत, दांत, कांत प्रिया हीन दीन वाली ॥ १ ॥
विनय धरुनि अनय त्यजुनि कीर्ति प्रतिपाली ॥
रुचिर प्रचुर धरि हरि पथ संत सौख्य चाली ॥२॥

आण्णा०-इजला काय देऊं आणि काय नको याच विचारांत मी पडलों आहें. नागेशराव पात्र, पण एक पात्र आहे!

नागेश०-( एकीकडे ) साहेब तर इला पाहून खूप झालेले आहेत व मर्जी तर विशेषच दिसत आहे; मग आपलें तरी नुकसान कां करून घ्या. होईना कां उद्यांच सर्व निकाल! (उघड) देऊन टाका एकंदर चारशें, मी व्यवस्था करवितों.

आण्णा०-बरें आहे द्याच.

वारांगना—

पद ( चाल—नृपाल कोप० )

बहूत लोकमान्य जाहला तुह्मी ॥
धन्य ह्मणुनि घेत हो खरोखरी ॥
आद्यपीठ आमुचेंहि तूंच शोभवी ॥
अहा ॥ प्रिया ॥ सुकोमला ॥ प्रजा
ही पाली ॥ सदय होउनी ॥ १ ॥

[ पडदा पडतो व सर्व जातात. ]

अंक १ ला समाप्त.



# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

( स्थळ–बगीच्या. )

माधवराव–वहावा, काय ही शोभा–

पद ( झंपा. )

किती रम्य आराम वाटे मनासीं ॥
शोभती सफल वृक्ष ते सत्पथासी ॥ धृ० ॥
पुष्प वृक्षावरी भ्रमर हे हिंडती ॥
त्यांतुनी मधु मधू सेवण्यासीं ॥ १ ॥
आम्र वृक्षावरी कोकिला रव करी ॥
शांतवाया मना पीडिल्यासीं ॥ २ ॥
तडागाभ्यंतरीं पक्षिगण पोहती ॥
गमत तो हर्ष या मन्मनासीं ॥ ३ ॥

हें पहा बळवंतरावजी ! याच तलावाचे कांठीं आपण बसूं या. कारण एकीकडे असल्यानें आपणास कोणत्याही कर्ण पिशाच्याची भीति बाळगण्याचें कारण नाहीं.

बळवंतराव–दुसरें, या ठिकाणीं करमणूकहि चांगली होण्यासारखी आहे.

माधव०–तेंही खरें, पण मन स्वस्थ असेल तेव्हांना ह्या सर्व गोष्टी सुचणार ?

**बळवंत**०–आपलें मन तें अस्वस्थ कां ? आपणा सारख्यास ती काळजी कशाची असणार ! सांगण्यासारखें असल्यास कळेल तर होतां होईल तों निवारण करण्याचा प्रयत्न करण्यांत कसूर करणार नाहीं.

**माधव**०–याठिकाणीं येण्याची आपणास जी तसदी दिली ती याच साठीं. शंकरराव व मी मिळून दोघांनाही वाड्यांतील व त्याचप्रमाणें दरबारांतीलहि कारभारांत न पडण्याबद्दल सक्त ताकीद झाली आहे. त्या पाजी नागेशरावाचे संगतीनें आमचे आण्णासाहेबांनीं वाटेल तसें वागण्यास सुरवात केली आहे. शंकररावावर दोषारोप, ते कुळास त्रास देतात असा आहे; पण तो व्यर्थ असल्याचें सर्वश्रुतच आहे. माझा दोष काय ह्मणाल तर, लोकांचे दीनावस्थेकडे पाहून मी यंदा बाकीबद्दल सक्ती केली नाहीं हा होय. हल्लीं शंकररावानीं ठरविलेल्या सर्व गोष्टींस फांटा मिळालेला आहे. दुष्काळसंबंधीं निघालेलीं कामें बंद पाडलीं आहेत; लोकोपयोगी संस्था पार धुळीस मिळविल्या; जंगलहिं प्रजेस बंद केलें, तेंही असो. पण आतां तर काय शेतकऱ्यांची अत्यंत आवडती जमीन–"जी निवळ त्यांचा आधार" ती देखील त्यांस शेतसाऱ्यासाठीं गहाण अगर विक्री टाकावी लागेल, असा नवीन सुटलेल्या हुकुमावरून रंग दिसत आहे. नवीन कारभारी सारा वसूल करताहेत ती आमची तिजोरी भरण्या करितां नाहींच, तर स्वतःच्या चैनीसाठीं, स्वतःच्या ऐषआरामासाठीं व नानाविध दुष्कृत्यांसाठीं पैसा उधळण्यास सांपडेल वगैरे विचाराकरतांच आहे. शिव, शिव ! किती पाजीपणा हा ! पण अशा अन्यायानें व विश्वासघातानें मिळविलेल्या पैशाचा परिणाम कधींतरी चांगला होईल काय ? शिवाय त्या लुच्याचे संगतीनें गांवांतील अब्रुदार गृहस्थांचें

कीर्तीस काळिमा लागण्याजोगे प्रकार आण्णासाहेबांकडून नित्य होत आहेत. ह्या व अशाच प्रकारच्या नित्य होत असलेल्या त्रासांनीं लोकांचीं मनें विथरलीं आहेत. ह्याचा परिणाम ठीक होईलसा दिसत नाहीं. ह्मणून या सर्व गोष्टींचा विचार करितां माझें मलाच कांहीं सुचेनासें होतें व अशाच प्रकारच्या नानाविध काळज्यांनीं—

पद (चाल—नाहिं सुभद्रा०)

सौख्य लेश मज नाहीं खचितचि मित्रा हें ठावें ॥
नाना तरंग उठती हृदयीं तुज नच सांगावें ॥

परंतु मित्रा सांगतों—

एकवार वाटे कीं मजला स्थळ हें सोडावें ॥
किंवा तत्कल्याणास्तव मी देहा झिजवावें ॥
एकवार वाटे कीं अपुल्या दादा बोधावें ॥
ईश्वरध्यानीं सक्त होउनी मोक्षा साधावें ॥
किंवा विषमय पदार्थ सेवुनि असु हे त्यागावे ॥

असेंही माझ्या मनांत येतें, परंतु तसें करणें अगदीं निंद्य आहे. तेव्हां बळवंतराव, अशा थोर कुळांत अशा अपकीर्तीनें पुढें होणाऱ्या भावी परिणामाच्या दु:स्थितीमुळें माझें चित्त अगदीं व्यग्र होऊन मला—

पद [चाल—गांजितां०]

नच गमे मला या जगतीं ॥
मित्रा । वाटे । हृदयीं । खंती ॥ नच० ॥ धृ०॥
अग्रजाचिया दुराग्रहानें ॥

लय पावे सत्कीर्ती ॥ नच गमे० ॥
नागेशाच्या दुःसंगतिनें ॥
तन्मतिसी ये भ्रांती ॥ नच गमे० ॥

**बळवंत०**—खरेंच, आजचे स्पष्टवक्त्याचे जादापुरवणी अंकांत "अण्णासाहेब इकडे लक्ष देतील काय ?" या सदराखालीं आलेला लेख वाचल्यावर अशा प्रकारचा कांहीं घोंटाळा असावा अशाबद्दल माझी अटकळ होतीच. आपण तो लेख नीट वाचून पाहून त्या धोरणावर काय तें अण्णासाहेबांस सांगावें असें मला वाटतें. ते जागे होऊन चांगल्या रीतीनें चालल्यास आपणांस आनंद आहे, पण दुर्दैवानें जर त्यांस योग्य बुद्धि नच सुचली तर अगोदर लोकांचीं मनें त्रस्त झालीं आहेत व वरून अशा संकटाचे वेळीं बाकी वसूल करणें सक्तीनें चालल्यामुळें तीं जास्त क्षुब्ध होण्याचा संभव आहे. त्याचा परिणाम असा होईल कीं, लोकांची ओरड—आपण जाऊं देणार नाहीं पण. न जांणों—छत्रपती सरकारचे कानावर जाईल. सरकारास ही स्थिति बिलकूल पसंत न वाटून अण्णासाहेबांचे हकास त्यामुळें धराच धक्का बसणार आहे. तेव्हां वेळींच सावध राहण्याचा प्रयत्न करणें चांगलें नव्हे काय ?

**माधव०**—काय ह्मणतां, स्पष्टवक्त्याचे पुरवणींत मजकूर आहे ? मग विनायकराव एडिटर यांनीं चांगलेंच काम उचलिलें ह्मणावयाचें ! चला तर मीहि तें वाचून पाहतों व पुढील व्यवस्थेस लागतों.

( जातात. )



## प्रवेश २ रा.

( स्थळ—मार्ग. )

**नागेशराव**—( आनंदानें )—

पद ( सवाई )

प्रतिकुल मजला असतिल त्यांना
पाडिन फांशि खराच तरी मी ॥
ठाकुनि गप्पा भुलवुनि त्यांना
दाविन मौज खराच तरी मी ॥
साधुनि संधी घेरिन तिजला
पुरविन हेतु खराच तरी मी ॥
मारुनि डल्ला उडविन पैसा
भोगिन भोग खराच तरी मी ॥ १ ॥

माझ्या ह्या मार्गांत असलेल्या आडकाठ्या बाजूला तर केल्याच; आतां पुढें मार्ग क्रमण्यास हरकत तर दिसत नाहीं. पण, न जाणो कोणी दुष्टानें त्याच काठ्या पुढें मार्गावर आणूं नयेत, ह्मणून त्या अजिबात नाहींशा करण्यास आपणाजवळ या वेळीं हत्यार असतें तर बरें होतें. चला तर अगोदर त्याची व्यवस्था करूं व नंतर पुढें जाऊं. ( खिशांतून एक कागद काढून दाखवितो ). हें पहा माझ्याजवळ कसें जालिम हत्यार आहे तें ! पण इतका वेळ खरोखरच मला ह्याची आठवण नव्हती. आतां निकाल केलाच ह्मणून समजा. आतांशा पैशाची तर बिलकूल कमतरता नाहीं. थोडे थोडके ह्मटले तरी गेल्या चार सहा महिन्यांत तीस हजार रुपये तर काढले. याप्रमाणें

बोलबोलतां सर्व काढून एकदां का लाख दोन लाखांचा धनी झालों ह्मणजे मग कशाला राहणार आहे फक्कड येथें ? धरतोंच उत्तरेचा मार्ग नी काय ! जसा इकडे जय मिळविला आहे तसा घरांतील उद्योगांत मिळाला ह्मणजे मग कृत कृत्य मानण्यास मुळींच हरकत नाहीं. काल पहिल्या भेटीलाच कशी छाप ठेवून आलों. जर आणखी थोडकावेळ आण्णासाहेब घरीं आले नसते, तर कांहीं तरी बोलण्यास संधी मिळाली असती खास ! घाई करुन जुळणार नाहीं. सर्व कांहीं नेटानेटानेंच घेतलें पाहिजे. कायरे गुलामा, शंकऱ्या ! माझे समक्ष मी लबाड, मूर्ख, पाजी, बदमाष आहे ह्मणून आण्णासाहेबाजवळ सांगितलेंस नाहीं ? ठीक आहे. याद राखून ठेव बच्चारामजी. माझ्याशीं गांठ आहे. न टार करीन तर नांवाचा नागेशराव नव्हे ! गुलामांनो; धन, अधिकार आणि मोठेपणा यांचे लोभानें आण्णासाहेबाविरुद्ध वरळतां नाहीं ? बरें आहे आज. मजजवळ दाखविण्यास हें पत्र, एक सबळ पुरावाच आहे. पहातर कशी, चांगले उत्तम रीतीनें आण्णासाहेबांची उलट समजूत करून देऊन तुमच्याच तंगड्या तुमच्या गळ्यांत अडकवितों त्या. ही तुमची आपमतलबी कृती कोणालाच समजेत नाहीं, असें तुह्मी समजतां होय ? तुमच्या संबंधानें आतां मुळींच धास्ती उरली नाहीं, आणि आज तर काय ह्या ( किल्यांचा जुडगा बाहेर काढून ) हातांत आल्यामुळें—

पद ( चाल—या पैशाच्या ढोंगापुढती )

**आज सकल ही इच्छा माझी पूर्ण कराया**
**बल हें आलें ॥ बल हें आलें ॥**
**सुवर्स्वी तें धन उधळुनीया ॥**

चैन करिन मी आतां पहिलें ॥
सुरुप सुंदरी ॥ मदनमंजरी ॥
मनरमणी ती ॥ करिन वश खरी ॥ १ ॥

( जातो. )

## प्रवेश ३ रा.

( स्थळ—वाडा. )

**रमाबाई**–इतकें त्रासून रागावण्यास मुळींच नको. जर कुठें बाहेर जावयाचें असेल तर माझ्याकडून आडकाठी नाहीं, आपण खुशाल जावें. पण त्या बाहेर जाण्याला कांहीं सीमा तरी पाहिजेना मेली !

**आण्णासाहेब**–मी ह्मणे नेहमीं बाहेर जात असतों. आज फार तोंड सुटलें आहे ! उगीच कोठें नागेशरावाबरोबर फिरावयास गेलों होतों, कांहीं एकटा नव्हतों गेलों.

**रमा०**–त्या मेल्या नाग्याचं नांव जरी नुस्तं कानावर पडलं तरी अंगाचा कसा संताप होऊन जातो ! आणि काय ह्मणणं होत आहे कीं, मी त्याच्या बरोबर फिरण्यास गेलों होतों ! मोठा. संभावित कीं नाहीं तो ! हरामखोरानं आमच्या घराचं वाटोळं करण्याची वेळ आणली आहे. किल्या देखील त्याचेच हातांत ! शंकरराव व भाऊजी यांस काढून लावलंत ! त्यांनीं आपले कांहीं गुन्हे का केले आहेत ?

**आण्णा०**–बस, पुष्कळ झाले. एक नव्हे शंभर गुन्हे केले आहेत त्यांनीं, समजलीस ?

**रमा०**—आपणच पहा कीं, माझं सुखदुःख आपल्यावर अवलंबून असल्यामुळें राहवत नाहीं. आपले गणपतराव आणि भाऊजी नेहमीं ह्मणत असतात कीं, इकडच्याबद्दल फार काळजी वाटते. तें ऐकिल्यापासून माझं अंतःकरण किती धडधडून येतं. पण हें सांगून उपयोग काय ? आज दिवस कसा जाईल, उद्यांचा कसा येईल अशा प्रकारच्या—

( चाल—भुजंगप्रयात. )

**बहू कल्पना येति नाना तरंग ॥**
**अती दुःख होतां मती हो दुभंग ॥**
**विचारें अशा जाहले दीन पाहीं ॥**
**करूं काय आतां सुचेना जराही ॥ १ ॥**

शिवाय येथें तर काय शंकरराव गेल्यापासून सर्व विश्वास नागेशरावावर टाकला आहे. त्याच्या एकेक गोष्टी ऐकिल्या ह्मणजे तो सुस्वभावी व सद्वर्तनी आहेसें वाटत नाहीं. आपणास कोणत्या वायकोचा गळा कापतां येईल याचा विचार करीत केवळ स्वतःच्या सुखाकडे लक्ष देऊन तो फिरत असतो. असं नसतं तर आपल्यामागें काल रात्रींच्या वेळीं तो येथें कां चघळपणा करीत बसता! माझा घात करावा असा त्याचे मनांतील हेतु नव्हे काय? माझं निक्षून सांगणं हेंच कीं, त्याला घरीं येण्याचं अजीबात बंद केलं पाहिजे. मजवर कृपा करा . आणि त्याला काढून टाका. नाहींतर एकादे वेळीं अब्रूहि जाण्याची वेळ येईल, याचा विचार करा. बऱ्यावाईट दोन गोष्टी सुचविल्याबद्दल—

पद ( चाल—सज्ज करुनि चाप मदन० )

**करुनि कृपा दासिवरी कोप नच करा ॥**

कर जोडुनि विनति करी नीति हो धरा ॥
दुःसंगति सुखद नसे हृदयिं या स्मरा ॥
दुःस्थिति ती होय पुढें आवरा स्मरा ॥
पूर्वजांसि अनुसरुनी कीर्तिसीं वरा ॥
दीर्घायू होउनिया दीनता हरा ॥ दीनता हरा ॥ १ ॥

आण्णा०—नागेशरावसंबंधानें हा तुझा गैरसमज आहे. तो मनुष्य असा असेल असें मला नाहीं वाटत. योग्य आहे तेंच मी करीत आहें. गाढव कुठली !

रमा०—परिणामावर नजर देत नाहीं याला काय ह्मणावें ?

आण्णा०—अग वेडे, तूं मला ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी शिकवतेस?

रमा०—तसें नव्हे, मी आपली क्षमा मागतें. ( पायां पडते )

आण्णा०—

पद ( चाल—बस करि. )

मुख तुझें त्वरित कर बंद ॥ दुष्टे । मूढे ।
सोडी । मत्छंद ॥ धृ० ॥ मुख तुझें० ॥
वाक्‌चातुर्यें सांगुनि शास्त्रा होशिल कां तूं ज्ञानी ॥
छेदुनि जिव्हा टाकिन अथवा करिन असूची हानी॥
मुख तुझें त्वरित कर बंद ॥ १ ॥

( तिला लोटून निघून जातो. )

रमा०—( आपल्याशीं ) हे प्रिया, मी तुमचा छंद सोडूं तर धरूं कोणाचा—

पद ( चाल—चंद्रकांत राजाची कन्या० )

हाय हाय हो नाथांच्याती निष्ठुरता हृदयीं ॥

गरीब अबला पायां पडली दिलि लोटुनि घाई ॥धृ०॥
दुष्ट संगती नागेशाची जडलि कशिग बाई ॥
नाथाचें तें मन वळवाया करूं गत मी काई ॥ १ ॥
आइ जगदंबे शरण तुला मी घे जवळी बाला ॥
प्रियपतिचें तें वर्तन बदलो वर दे हा मजला ॥ २॥

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश ४ था.



( स्थळ-वाडा. )

**पात्रें—नागेशराव, आण्णासाहेब व माधवराव.**

नागेश०—विशेष महत्वाचें काम असल्यामुळें यावेळीं येणें भाग पडलें आहे. हें काम कमी महत्वाचें नसून फार विचार करण्याजोगें आणि आपणास पुष्कळदां सांगितलेल्या गोष्टींचा प्रत्यंतरी पुरावा ह्मणून आहे. मी आपणांस सांगितलेलें आठवत असेल कीं, शंकररावाचे मनांतून आपणांस न विचारतां माधवरावांचे सल्यानें सर्व कारभार करावा असें आहे व याचसाठीं तो आपले जवळ बेपरवाईनें वागत असतो. हे माझे शब्द आज अगदीं खरे होऊं पाहात आहेत. आजचे स्पष्टवक्त्याचे पुरवणींत " संस्थानिक साहेब इकडे लक्ष देतील काय ? " या सदरा खालीं असलेला लेख वाचून पहावा ह्मणजे ध्यानांत येईल.

आण्णा०—काय ह्मणतां ? माझे विरुद्ध मजकूर पत्रांत आहे ? वाचा पाहूं.

नागो०—ठीक आहे ऐकावें. ( पत्र वाचूं लागतो. ) "अलीकडे आमचे पालक आण्णासाहेब यांचे हातून—चुकीनें ह्मणा किंवा अन्यकारणानें ह्मणा—होत असलेल्या अनाचाराबद्दल व निष्काळजीपणाबद्दल सर्वत्रांस वाईट वाटत आहे. तर अशावेळीं सूचनेदाखल दोन शब्द लिहिले तर ते अनुचित होणार नाहींत असें वाटल्यावरून तसें करीत आहोंत, तर तिकडे त्यांचें लक्ष जाईल ही दृढतर आशा आहे.

ह्या जगतीतलावरील हरएकांवर थोडीबहुत जबाबदारी असतेच; परंतु ज्यांस पुष्कळांचें पालन करावें लागतें त्यांचेवर या जबाबदारीचा विशेष बोजा असतो. सामान्य मनुष्याच्या बऱ्यावाईट वर्तनाचा परिणाम दूरवर पोंचत नाहीं परंतु आण्णासाहेब आमच्या सर्वांचे अधिपती असल्यामुळें त्यांच्या अविचाराचा परिणाम यच्चयावत् त्यांचे सर्व प्रजाजनांस तात्काळ भोगावा लागणार आहे. या साठीं त्यांचें वर्तन अत्यंत विचारशील व शुद्ध असलें पाहिजे. द्रव्यमद व दुःसंगति या मुळें जगांत अनेक व्यसनें जडतात. आणि या व्यसनांचा अतिरेक झाल्यावर मनुष्य फुकट गेलाच ह्मणून समजावें. वर दर्शविलेल्या सर्व गोष्टी आण्णासोहब पूर्णपणें लक्षांत आणतील. त्यांचे एकदोन बगलबच्च्यांनीं हा सर्व घोंटाळा मांडिला आहे, असें ह्मणण्यास आह्मी निःशंकपणें तयार आहों. अहो, विचार करा कीं, तुमच्या दुर्वर्तनांत उधळण्यासाठीं नानाविध स्वार्थपर जुलमांत हा लहानसा देश पैसा किती व कसा पुरवणार, अधिकारपदारूढापुढें आह्मी किती वेळ व काय निभाव धरणार. अगोदरच निर्धन, निःत्राण, निर्वीर्य व हताश झालेले लोक अशा त्रासापुढें कितीवेळ टिकाव धरणार ! सारांश चालू स्थितींत लोकांना या पुढें दिवस काढणें कठीण वाटणार आहे, याचा

विचार आण्णासाहेबांनीं करावा. यांत सर्वच दोष त्यांचा आहे असें आह्मी कधींही ह्मणणार नाहीं. या आमचे लिहिण्यावरून ते आह्मावर रागावतील हें जाणून आहों. परंतु त्यांचें कल्याण हेंच आमचेंही, अशी खात्री असल्यामुळें सध्यां रागास कारण झालों आहों. वर निर्दिष्ट केलेलें कारण गैरवाजवी असलें पाहिजे, किंवा त्यांची प्रकृती अस्वस्थ असल्यामुळें त्या लहरींत ते असें करीत असावेत व खरोखर असें असेल तर त्यांनीं सर्व कारभार माधवरावावर सोंपवून थोडे दिवस भणभणलेल्या डोक्यास विश्रांती घेण्यासाठीं थंड हवेवर गेलें असतां सर्वांस होणारा त्रास चुकून लोकांचे धन्यवादास ते पात्र होतील. इतकें सांगून तूर्त आज रजा घेतों."

**नागेश**०-शेवटीं काय मतलब आणला आहे हें आलें का-आपल्या लक्षांत ? कारभार माधवरावाचे स्वाधीन करून आपण कोठेंतरी जावें. ठीक आहे युक्ती. आपण एकदांचे गेलेंत म्हणजे यांची सर्वत्रांची चैन तरी साधेल. नाहीं तर मग विचारतो कोण ?

**आण्णा**०—काय हा पाजीपणा !

**नागेश**०—असा तसा त्यांना डाव साधत नाहीं मग त्यांनीं पाजीपणा करूं नये तर करावें तरी काय ?

**आण्णा**०—नागेशराव ! कांहीं तरी योग्य विचार लौकरच केला पाहिजे. कारण लोक चोहोंकडून आपले पाठीमागें लागले आहेत. त्यांतून ह्या पत्रद्वारें गोष्ट तर जगजाहीर झाली आहे ह्मणून अद्यापीहि आपण नीट बंदोबस्त न केला तर वरून दपटशा बसेल. मग मात्र जबाब देणें जड जाईल. याचा कायतो विचार करा; तेव्हां अगोदर माधव व शंकरराव यांस घेऊन या ते कांहींतरी व्यवस्था लावतील.

नागेश०–अहो याच दोघांचें हें कृत्य. शंकरराव यास पैशाची आशा, व माधवरावास अधिकाराची महत्वाकांक्षा. अशाप्रकारचे दोघांचे स्वभाव असल्यामुळें आपला उत्कर्ष सहन न होऊन मत्सरभावानें असलीं कुभांडें रचण्यास ते उद्युक्त झाले आहेत. वरवर अगदीं मधुर भाषण करितील व करून सवरूनहि उपदेश सांगण्यास तयार होतील. 'चोरच्याचोर आणि शिरजोर' ह्मणतात ते यांनाच! आण्णासाहेब! यांत भिण्याचें मुळींच कारण नाहीं. मी सांगतों याप्रमाणें व्यवस्था झाल्यावर सर्व ठीक होणार आहे.

आण्णा०–काय युक्ति काढाल ती खरी.

नागेश०–सांगूंच तर–( कांहीं कानांत सांगतो ) समजलांत ? असें झालें असतां आपणास कशाचीही काळजी नको. ( समोर पाहून ) आपले बंधुराज येताहेत असें वाटतें तर मी आतां जातों.

आण्णा०–( थोडा वेळ विचार करून ) हें पहा नागेशराव, तुह्मी काढिलेल्या युक्तीबद्दल मी तुमचा फार आभारी आहें. घडेल तेव्हां खरें. ( नागेशराव जातो. )

माधव०–( प्रवेश करून ) आण्णासाहेब !

दिंडी.

नमन साष्टांगीं करित सदां पायीं ॥
विनति करितों मी इष्ट इच्छुनीही ॥
बंधुराया तूं ऐक समाचारा ॥
स्वस्थ चित्तातें करुनि नीट सारा ॥ १ ॥

आण्णा०–ठीक चालूं द्या. मी ऐकतों.

माध०–आपण सर्व राग टाकून मी काय म्हणत आहें हें

प्रथम ऐकून घ्यावें. गेल्या चार पांच महिन्यापासून ह्या नीच, पाजी व हरामखोर नाग्याचे सहवासानें आपले हातून बरींच अविचाराचीं दुष्कृत्यें घडत आहेत. व यामुळें तो त्रास लोकांस सोसवेनासा झाला आहे. असा कोणता त्याचे अंगीं गुण आहे कीं, त्याजवर आपण एवढे खूप आहां? तो कांहीं मोठा कारस्थानी मनुष्य नव्हे कीं, एकादी अती महत्वाची सल्ला मसलत करून तींत आपले कल्याणाची, मोठेपणाची अगर नांव वाढेल अशी गोष्ट करून दाखवील. त्याचा सर्व शहाणपणा नीच पणाच्या गोष्टी करण्यांत हरामखोर पणांत पाजी पणांत व सभ्य गृहस्थांचा अपमान आणि हिरमोड करण्यांतच आहे. हा त्रास इतका असह्य झाला आहे कीं, लोक लवकरच वरिष्ठाकडे दाद मागण्यास जाणार असल्याचें ऐकतों. यापूर्वीच ते जाणार होते परंतु स्वाभिमानी असल्यामुळें आणि आधी पासूनच आपल्या स्वातंत्र्यप्रिय अमलाखालीं राहण्याची संवय. झाल्यामुळें म्हणा—

पद ( चाल—नृपतनयेवर हें मन माझें० )

आह्मांवरती भक्ती त्यांची आहे पहिल्या पासोनी ॥
ह्मणोनि नाहीं खटपट केली अर्जद्वारा जावोनी ॥
शेवटीं प्रजा ॥ दीन होउनी ॥ मागतील हो-
न्याय प्रार्थुनी ॥ करुनि विचारा द्यावा त्यांना
न्याय यथार्थहि सन्मानी ॥ १ ॥ आह्मांवरती भक्ती ॥

हा सर्व आण्णासाहेब त्या एकट्या दुःसंगतीचा परिणाम झाला. यामुळें काय काय अनर्थ घडतात पहा.

दिंडी

दुष्ट संगतिनें आत्मबुद्धि जाते ॥

अवीचारें तें सर्व फळा येतें ॥
अशा मनशाहो बहुत तेथ पाहे ॥
काम लोभाचा वास सदां राहे ॥ १ ॥

आणि त्याचा परिणाम हा कीं–

दिंडी.

कुबुद्धीनें मित्र ते दूर झाले ॥
अभीमानें हें सर्व लया गेलें ॥
क्रोध लोभें जाहले किती वैरी ॥
काम मत्सर घालवी कीर्ति सारी ॥ १ ॥

यासाठीं–

पद ( चाल–दैवयोग दुर्विपाक० )

दुष्ट संग योग्य नसे सूज्ञ नरवरा ॥
शास्त्र श्रुति अनुभव हा येत मज खरा ॥
सोडुनियां आग्रह हा नीतिसी धरा ॥
वडिलांच्या कीर्तीचा विलय नच करा ॥
पुत्रासम दीन प्रजा दुःख हें हरा ॥
आप्त इष्ट मित्र यांसि योग्य अनुसरा ॥ १ ॥

तेव्हां अझूनहि आपण याचा विचार करावा असें मला वाटतें.

**आण्णा**०–माधवराव ! तुझी कृति अनुपकारिणी असेल ही शंका देखील नव्हती. पूर्वीं जर असें कळतें तर तेव्हांच त्याचा बंदोबस्त नीट केला असता. मला एकीकडे बसवून सर्व कारभार आपणास मिळावा या इच्छेनें कारस्थानें रचून वर्तमानपत्रांतून जाहीर केलेंस आणि सर्व करून निराळें राह-

ण्याचा कावा दाखवितोस ! ह्या युक्त्या निदान अझून तरी मी शिकलों नाहीं.

**माधव॰**—मला कशाचीही इच्छा नाहीं, हें मी खात्रीपूर्वक सांगतों. पत्रांतून मी जाहीर केलें नाहीं. तथापि मीच लिहिलें अशी आपली समजूत जाहली असल्यास हरकत नाहीं. कारण ती सर्व खरी स्थिति असून लिहिणारानें कलकळीनें आणि सद्‌हेतूनेंच लिहिली आहे. म्हणून अझूनही आपण विचारानें, न्यायानें, नीतीनें न चालल्यास वडिलांचें नांव कीर्ति व मोठेपणा बुडविल्याचें सर्वस्वी दूषण आपणावर पडेल हें लक्षांत घ्या.

**आण्णा॰**—तुझ्या अशा भाषणांनीं मीं भिऊन जाईन असें समजतोस काय? निमुटपणें येथून चालतें व्हावें हें उत्तम. आम्ही वाटेल तें करूं. सर्व राज्य गमावूं. तुला पंचाइत करण्याची जरुर काय ?

**माधव॰**—आपलें हें भाषण किती चमत्कारिक व वेडगळपणाचें आहे म्हणून सांगूं ? अहो स्वातंत्र्यप्रीति, अभिमान, स्वराज्यसेवा वगैरे गुण आजच नष्ट झाले काय ? राज्य बुडवूं असें म्हणतां व यावरून मला असें वाटतें कीं, आपल्या अंगीं असलेल्या मिथ्याभिमानाचें वारें अझूनही जात नाहीं. तर मग तसें होणारच. पण लोक आपणास—

**साकी.**

**थोरकुळीं हे मूर्ख जन्मुनी त्रासविती दिनरजनीं ॥**
**सकल प्रजाही निंदा करितिल व्हावें सावध स्वमनीं ॥**
**रक्षा स्वकुलातें ॥ कुदशा आणालचि हातें ॥ १ ॥**

**आण्णा॰**—तुझा शहाणपणा माझ्या उपयोगी नाहीं, समजलास ? चल हो चालता अगोदर.

माधव०-अझूनही आपले लक्षांत येत नाहीं, तेव्हां दुर्दैवाची खडतर रेघ मध्यें पडली आहे असें म्हटलें पाहिजे, असो. दुर्दैव आमचें व आमच्या प्रजेचें ! कारण-

साकी.

ब्रह्म लिखित तें नटळें कधिंही ऐसें सज्जन ह्मणती ॥
तदनुसारिणी बुद्धी होउनि फंसतो मनुजहि अंतीं ॥
इच्छा ही प्रभुची ॥ दिसते स्पष्ट मला साची ॥ १ ॥

( जातो, पडदा पडतो )

अंक २ रा समाप्त.



# अंक ३ रा.



## प्रवेश १ ला.



( स्थळ–लायब्ररी. )

पात्रें—बळवंतराव, भास्करराव, गोविंदराव, पोस्टप्यून

**बळवंतराव**—आहे का कांहीं लोकल भास्करराव ? आपल्या येथील असेल कांहीं हकीकत तर वाचा पाहूं.

**भास्करराव**—काय म्हणतां ? आपल्या बातम्या बाहेरच्या पत्रांतून प्रसिद्ध होणार ! बहुतकरून कधींच नाहीं. तथापि आपले येथील स्पष्टवक्त्याचे आजचे पुरवणी अंकांत कांहीं तरी विशेष मजकूर वाचण्यास सांपडेल खचित. ( इतक्यात पोस्टमन येतो ) आलेंच हें पत्र. गोविंदराव घ्या बरं तें वाचा पाहूं.

**गोविंदराव**-(पत्र फोडून ) ऐकाहो मंडळी. ( वाचितो )

आश्चर्य ! आश्चर्य ! आश्चर्य !

गेल्याचे मागील अंकीं आम्हीं आपल्या कर्तव्यास जागून आण्णासाहेबांस दोन उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या होत्या तिकडे त्यांचें नुसतें लक्ष गेलें नाहीं इतकेंच नव्हे, तर उलट एक ज्यास्त घाणेर्डा व नामर्दपणाचा प्रकार प्रसिद्ध करणें आम्हांस भाग पडत आहे, ही खरोखरच दुर्दैवाची गोष्ट समजली पाहिजे. आम्हीं लिहितों या गोष्टीस पंधरावर दिवस झाले असतील, त्या दिवशीं सायंकाळचे वेळीं आण्णासाहेबांचे साक्षात बंधु माधवराव हे कांहीं कामासाठीं

वाड्यांत गेले होते, ते ह्या वेळेपर्यंत परत आले नाहींत व तेथें अगर बाहेरही कोठें आढळल्याचें कोणास स्मरत नाहीं. भयंकर अगर ओसाड नव्हे, तर मनुष्यांनीं गजबजलेल्या वाड्यांतून माधवरावांस भुतानें तर नसेलना उचलून नेलें, अगर पिशाच्यानें तर नाहींना गिळलें. कांहीं असो पण त्यांचा नापत्ता होणें हें आश्चर्य नव्हे काय ? ह्यांतून भावाचा नापत्ता होणें ही गोष्ट आण्णासाहेबांचे कानावर अजून न जाणें ह्मणजे किती आश्चर्य ! व गेली असेलच तर पत्ता लावण्याचा प्रयत्न न करणें ह्मणजे महदाश्चर्य होय. चोरांच्या उलट्या बोंबा ह्मणून लोक म्हणतील या न्यायानें तर नसतीलना ते उगे बसले. ते व त्यांचे सल्लागारांचे यांत गूढ अंतस्थ हेतु कांहीही असोत परंतु तूर्त खऱ्याखोट्या गोष्टी स्पष्टपणें सांगण्यास कोणी उरलें नाहीं एवढें मात्र खरें. ज्या ठिकाणीं नीतीची पर्वा उरली नाहीं, खऱ्याखोट्याचा विचार राहिला नाहीं, अंदाधुंदीचें साम्राज्य माजलें आहे, तें ठिकाण शून्यवत् नव्हे तर मृतवत्च आहे अशी खात्री ठेविली पाहिजे. त्यांच्या नाशांतच त्याची उन्नति होणार. अवनति नंतरच उन्नति यावयाची. देशाच्या निकृष्ट स्थितींतच त्याचा उदय होणार आहे. आतां इतकी स्थिति येऊन पोहोंचल्यावर आशा बाळगणें हा मूर्खपणाचा कळस होय. आण्णासाहेबांचे पूर्वीच्या चांगल्या कृत्याबद्दल आह्मीं स्तुतीच करूं. पण गैरवाजवी गोष्टीस मोठेपणा देणें हें मात्र आमचे कडून होणेंच नाहीं. अजूनही आपण आह्मांस चांगल्या रीतीनें वागवाल तर वाटेल ती चाकरी करण्यास सेवक तयार आहोंत. याबद्दल ताबडतोब विचार होऊन अमलांत आल्यास दुसरा तो कोणता आनंद पाहिजे. जातां जातां शेवटी पुनः एकवार अवश्यमेव मागील तेंच सुचवावयाचें

कीं, आपले हाताखालील कांहीं लोकांचा धंदा झटला ह्मणजे गांवांतील सभ्य लोकांचा हिरमोड व अपमान करणें हाच आहे. तर अशा अविचारी मनुष्यांचे हातांत कारभार देणें अगर त्यांना अधिकारावर चढविणें ह्मणजे शुद्ध माकडाच्या हातांत कोलीत देणें होय.

**बळवंतराव**—माधवरावांचा पत्तानाहीं! विलक्षण गोष्ट आहे बुवा. हा काय भयंकर व्यूह आहे हें समजल्या शिवाय आपणांस तरी बरें कसें वाटावें !

**गोविंदराव**—या ठिकाणीं चर्चा नको. चला सर्वजण विनायकरावाकडे ह्मणजे अनायासें उलगडा होईल.

( सर्व जातात. )

---

## प्रवेश २ रा.

( **स्थळ**—वाडा )

गणपतराव, आण्णासाहेब.

**गणपतराव**—काय आण्णासाहेब ! आपणांस म्हणावें तरी काय ! अहो वेड तर नाहींना. दुष्काळा सारख्या भयंकर तुफानांत सांपडलेल्या प्रजा जनांचें रक्षण तुम्ही करणार नाहीं तर त्यांची गत तरी होईल कशी ! दुष्काळ कामें तुम्ही बंद करविलींत, जंगल बंद करविलेंत, बरें एवढें करून तरी स्वस्थ बसलांत तर तेंहीं नाहीं. हर तऱ्हेनें त्यांस पिळून काढण्याचे चरक आपण नित्य तयार करवीतच आहां. खाजगी वर्तन तरी नीट आहे ! छे, छे, पर्वा नुकताच घडलेला प्रकार लोकांच्या आठवणींतून गेलाही नाहीं तोंच आपण काल कोठें बरें गेला

होतां. पुर्वींचें तें प्रकर्ण विश्वविण्यास मला किती त्रास पडला याचा कांहीं विचार! पुनःअसें न करण्याबद्दल सांगीतलेलें फुकटच गेलें म्हणावयाचें.

**आण्णा**—धन्य आहे तुमची. इतक्यांत तुम्हाला त्याची बातमी देखील लागली आं.

**गणपत**—ही तुमची दुसरी चूक. तुम्ही असें समजतां काय कीं गुप्त म्हणून जीं कृत्यें करतों तीं दुसऱ्यास समजत नाहींत म्हणून !

**आण्णा०**–अहो पण तुमच्याशीं छपवून ठेवण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं.

**गणपत०**–ही मोठी अब्रूची गोष्ट आहे अशांतला प्रकार नाहीं. तुह्मीं आपले मनांत थोडासा वचक बाळगून आहांत तोंपर्यंत मला तुमचें मन वळेल अशी आशा वाटते. नाहींतर मी प्रयत्नही केला नसता. जर तुह्मांला कांहीं अब्रूची व नीतिची चाड असती तर भर दिवसा असे चाळे न करतां. आपण कां विनाकारण—

पद. ( चाल–जबसे कलंदर० )

आत्महिताचा सोडुनि आदर अल्प सुखातें बधताहो ॥
रीति नीतिची करुनी माती सुकीर्तिला कां मुकताहो ॥
स्पष्ट तुह्माला आजि सांगतों उपदेशा मनिं ठेवा हो ॥
दुष्ट संगति सोडुनि देउन नीति मार्ग तो सेवा हो ॥

**आण्णा०**–तुह्मी देखील मजवर रागवावें ना ! मला वाटतें गावांतील इतर मंडळींचें तुह्मांस श्वास वारें लागलें. एरव्हीं माझे विरुद्ध आज बोललां नसतां.

**गणपत०**–अलीकडे तुमचीं व्यसनें फारच वाढत चाललीं आहेत. त्या अनाथ अबलेचा नाश करूं पाहत आहां यावरून तुमची किंमत कळते. तुह्मीं इतके पापी, दुष्ट व नीच आहांत कीं तुमच्याशीं समागम करण्यास काडीचाही मार्ग राहिला नाहीं. गावांत काय दुर्लौकिक चालला आहे, किती बेबंदशाई माजली आहे, याचा कांहींच कां विचार करीत नाहीं. अहो–

पद. ( चाल–साध्य नसे मुनि० )

आपण सूज्ञ ह्मणूनी । स्तवितों तुह्मा कर जोडोनी॥धृ०॥
दुराचरणिं या रत मन तुमचें। दुःख प्रजेसी होताचि साचें॥
काय वदूं मी वदनीं ॥ तेणें होई बहुतचि हानि ॥ १ ॥
योग्य गुणें ही कीर्ति मिळविली । परि ती सर्वहि विलया
गेली॥ऐका ध्यान धरोनी॥व्हावें जागें अपुल्या नयनीं ॥२॥

आणखी ऐका–

श्लोक.

काम तो प्रखर नित्य नवीन ॥
तो बसेलाचि तुह्मा चिकटून ॥
कुमति ही अति दुःखद जाणा ॥
नाश ती करिल हें मनिं आणा ॥

**आण्णा०**–गणपतराव, माझें मनच माझ्या स्वाधीन रहात नाहीं याला मी काय करूं. ही स्त्री साध्य करण्याचे आशे खेरीज मी सगळ्याला लाथ मारीन. ज्याप्रमाणें पिंजऱ्यांत सांपडलेला सिंह सुटकेसाठीं तळमळ करीत असतो त्याप्रमाणें तिला पाहिल्यापासून माझी स्थिति फारच चमत्कारिक झाली

आहे. तिची भेट व्हावी ह्मणून मी व नागेशरावानें किती प्रयत्न केले हें सांगवत नाहीं, परंतु अझून मला यांत मुळींच यश आलें नाहीं.

**गणपत**०-हें पहा, मी तुह्माला खरोखर सांगतों; थट्टा समजूं नका. जर हे बाईट ढंग व नागेशरावचा संबंध आजपासून सोडला नाहींत तर मी तुमचा कोणत्याही तऱ्हेनें संबंध ठेवणार नाहीं आणि हेंही सांगून ठेवितों कीं, आज पासून मी तुमचा पक्का वैरी होईन.

**आण्णा**०-माझ्या बद्दल इतके निष्ठूर कां बरें होतां ? मन अवरण्याचा प्रयत्न मी करीत नाहीं असें तुह्मी समजतां कीं काय. पुष्कळ खटपट केली पण माझें मन तिकडून निघतच नाहीं. या जगांत गणपतराव तुह्मी माझे नीतिबाईक तर खरेच पण शिवाय माझ्या खऱ्या कळवळ्याचे असे तुह्मी एकटेच मित्र आहांत. तुमचें न ऐकण्यापेक्षां माझें सर्वस्व गेलें तरी बेहत्तर आहे, तथापि हेंही खचित सांगतों कीं, तिची इच्छा सोडून देण्यापेक्षां तुम्हाला मी खुषीनें सोडीन.

**गणपत**०-ठीक आहे, तसेंच झालें पाहिजे. इतःपर मी तुमच्याशीं संबंध ठेवणार नाहीं हाच निश्चय. परंतु पुनः एकवार सांगतों कीं, बाबासाहेबांची थोर कृति लक्षांत आणा. यांचे सारखे धैर्यमेरू, दयेचे सागर, रणशूर, रणसिंह, वीर विरळाच झाले असतील. त्यांचा कित्ता सदैव पुढें ठेवा. त्यांचा नांवलौकिक केवढा होता, आपल्या या सौराष्ट्र देशाचें नांव त्यांनींच कायम ठेविलें आहे.

**पद.** ( चाल--किति कपटी अससि तूं० )

**भूपाल अमित ते जगतीं ॥ भूपाल अमित ॥ ध्रु० ॥**

सौराष्ट्राधिपति वीर एक परी ॥
जन सारे या प्रांतीं वदति ॥
यध्द्भूजि असतांना तेजोनिधि ॥
अपयश तम सन्निध ये कां कधिं ॥
अतुल पराक्रम पाहुनि युद्धिं ॥
नवल न विजयश्री त्या वरिति ॥
उभा ठाकतां येउनिया रणिं ॥
इतर नृप ग्रह माला तत्क्षणिं ॥
दिसे भोंवतीं मध्यें ग्रहमणी ॥
अरि मग केविं येइं पुढती ॥ २ ॥

ह्मणून ह्मणतों, अशा या वीर पुरुषाचे नांवाला अगदींच कलंक लावू नका. (जातो.)

---

## प्रवेश ३ रा.



स्थळ—एडिटरचें ऑफिस.

पात्रें—बळवंतराव, विनायकराव, गोविंदराव, व भास्करराव.

**बळवंतराव**—माधवरावासंबंधानें आपणाकडून समजलेली हकीकत ऐकून संतापातिशयानें माझें डोकें निवळ भाणाणून गेलें आहे. आपल्या संस्थानची स्थिति सुधारेल ही मात्र आतां आशा नको. आशा आणि निराशा यांच्या मध्यें सांपडलेला देश जास्त जास्त दरिद्रि होऊन व्यर्थ कंगाल दशेस मात्र येत असतो. ह्या पेक्षां एकदम रसातळास गेलेला काय

वाईट. यापुढें ज्यास्त बोभाटा करून कांहीं निष्पन्न होईल असें वाटत नाहीं म्हणून येथील स्थितिसंबंधानें जे कांहीं उपाय व बंदोबस्त करणें अवश्य आहेत ते आपणासच सर्वांचे विचारानें ठरविणें बेहत्तर आहे. बरें असो! अलीकडे तुम्ही पत्रांतून बरीच चर्चा चालविली आहे, त्याचा परिणाम लोकांची बोंब खरोखरच वर जाण्यांत न होवो, ह्मणजे झालें.

**विनायक**०—अहो, ह्या बातम्या संस्थानचे बाहेर कधींहि जाणार नाहींत. तुह्मी त्याची काळजी सोडा. योग्य ती खबरदारी मी प्रत्येक वेळीं घेत आहें. आमचें लिहिणें ह्मणजे फक्त आण्णासाहेबानांच कळावें एवढ्या साठींच आहे. आपले विचार, आपले हाल व पुढील अविचारांचे दुष्ट परिणाम त्यांस कळून यावेत या बद्दल आमचा नेहेमीं प्रयत्न सुरू आहे. त्यांनीं इकडेही दुर्लक्ष करून ते वरची पायरी चढले तरी आह्मी वर बोंब नेणार नाहीं व जाऊंही देणार नाहीं. कारण आमचे येथील आजच सर्व लोक बुद्धीहीन झाले नाहींत. आमच्या-येथील लोकांचा शहाणपणाचा, शौर्याचा, साहसाचा व नीतीचा आजच नायनाट झालेला नाहीं. आमच्या येथील कोणीही मनुष्य आपलें कर्तव्य पूर्णपणें न समजण्या इतका बुद्धिमंद झालेला नाहीं. ज्या लोकांना आपलें कर्तव्य माहीत नाहीं तेही आपलें कर्तव्यकर्म ओळखून आहेत. मृगजलाच्या मागें लागलेल्यांना कधीं तरी जलाची प्राप्ती ही व्हावयाचीच. तेव्हां हल्लींचे दोष शांतपणानें, निर्भिडपणानें, व गंभीरतेनें आण्णासाहेबांपुढें मांडून नाहींसे करून टाकण्याची सांप्रत आपण हिंमत बाळगून आहोंत. म्हणून त्यांचे अम्मलापासून जरी तूर्त बऱ्याच अडचणी सोसाव्या लागत आहेत तरी आगींतून निघून फोफाट्यांत जाण्यास कोणीच शहाणा मनुष्य बहुधा तयार

होईल असें वाटत नाहीं. यासाठीं त्याची काळजी सोडा.

**भास्करराव**—ह्या दुष्टकृत्यास नागेशरावास आण्णासाहेबांनीं संमति दिली हें नवल नव्हे काय ?

**गोविंदराव**—संमति दिली नसती तर मात्र नवल झालें असतें. कारण दुष्ट संगति भयप्रद ह्मणतात ती याचसाठीं. सर्व खरें, पण विनायकराव शंकररावची काय खबर. का तेही त्याच रस्त्याला ?

**विनायक०**—मारेकरी लोक व शूरसेन यांचे हातून शंकरराव निसटल्या पासून गुप्त रीतीनें येथेंच आहेत. पाहिजे असल्यास आपणा सर्वांस मग भेटवीनही.

**बळवंतराव**—ठीक आहे. मला असें वाटतें कीं, पुढील व्ययस्थेसाठीं भास्करराव यांस बाहेर पाठविणें आहे त्यांचे बरोबर शंकरराव यांस पाठवावे ह्मणजे त्यांस येथें लपून छपून तरी बसण्यास नको. माझ्यामतें तुह्मी जर—

पद. ( चाल—लग्नाला जातां० )

**ऐक्यभाव सर्वांचा, मिळुनि आपुला ॥ ध्रु० ॥**
**माधवाला येथ आणण्या, हेतु योजिला ॥ चाल ॥**
**काननांत जाउनियां ॥ वृत्त सर्व सांगुनियां ॥**
**लीनपणें प्रार्थुनियां ॥ त्यांस त्वरें आणिलिया ॥**
**विजय प्राप्ति खचित असे वाटतें मला ॥ १ ॥**

याप्रमाणें आपणांस केलें पाहिजे. कारण जो दुष्ट लोकांस त्रासवून आपण स्वतः किर्तीचा टेंभा मिरविण्यास तयार झाला आहे त्यास आपण शिक्षा ही केलीच पाहिजे. त्याचे दोष आपण चव्हाट्यावर आणले पाहिजेत. उलट आपण स्वस्थ

बसलों तर मूर्ख ठरून परमेश्वरानें दिलेल्या बुद्धीचा व शक्तीचा आपण दुरुपयोग करतों असें होईल. यासाठीं अगोदर शहरांतील पुढारी ह्मणविणाऱ्या गृहस्थांची लवकरच खाजगी सभा भरवून सर्वांचे अनुमतानें विचार ठरवावा असें मला वाटतें.

**सर्व**–ठीक. खालील गोष्टींचीच सभेंत चर्चा झाली पाहिजे.

**पद.** ( चाल–नृप ममता रामा वरती० )

**शांतता धरुनि राहावें ॥ पालकासि नच निंदावें ॥सुजनहो॥**
**मनिं त्यांचा आदर धरुनी ॥ अभिमाना नच सोडावें॥सु०**
**कीर्तीवरि धरुनी प्रीति ॥ आनंदें दिन कंठावे ॥ सुजन० ॥**
**मनिं मुग्धामृत पिउनी ॥ आशेवर स्वस्थ रहावें ॥ सु० ॥**
**तो ईश । करिल कीं त्राण । रक्षुनी प्राण । धैर्यबल घ्यावें ।**
**सौख्यार्थ देह झिजवावे ॥ सुजनहो ॥**

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ४ था.

**स्थळ**–अरण्य.

**माधवराव**–हरहर काय ही दशा––

**पद.** ( चाल–राम स्मरावा राम० )

**दुर्दिन ते आले ॥ किं मजवरी ॥**
**दुर्दिन ते आले ॥ धृ० ॥**

कर्मगती ही अवचित फिरतां ॥
संकटिं लोटियलें ॥ किं बंधुनें ॥
प्राण हरुनि मम इच्छा धरुनी ॥
दुष्टा योजियलें ॥ किं बंधुनें ॥
संकट हर्ता नाम प्रभो तव ॥
सत्य कळुनि आलें ॥ किं आज मज ॥

हे जगन्नियंत्या ईश्वरा ! मानवी स्वभावांत वैचित्र्य ठेवण्याविषयीं धन्य आहे तुझी. काय चमत्कार पहा, अधिकार आणि लोभ यांचे धुंदींत सख्या भावाचाही प्राणनाश करण्यास उद्युक्त होणें म्हणजे कितीतरी हा अधमपणा. शिव शिव ! मजवर आज असा प्रसंग यावा ना ! आण्णानीं त्या दुष्टाचे सांगण्यावरून माझ्यावर मारेकरी घालावेत यापेक्षां आणखी ते माझे दुर्दिन कोणते यावयाचे म्हणून समजावेत. शूरसेना ! तूं तरी बाबा नीच जातीचा असून सत्याची चाड ठेवलीस व मालकावर शस्त्र धरणें बरोबर नाहीं हें लक्षांत आणून मला सोडून दिलेस, या तुझे उपकाराबद्दल तुझी आतांच फेड केली असती परंतु उपाय नाहीं. (विचार करून) स्वार्थसाधू स्वतःचे मतलबासाठीं हवें तसें करील पण आण्णानीं त्याचें ऐकावें कां ! त्यांची बुद्धि चळली किंवा झालें तरी काय ! सर्वच वेड्याचा बाजार माजला आहे. ज्या दुष्ट नाग्यानें आमच्या गरीब प्रजेचा व माझा छळ आरंभिला आहे त्याचा सूड हा माधव खचित खचित उगवील. मी हल्लीं परदेशी आल्यामुळें स्वतंत्र व मोकळा बनलों आहें. नागेशानें माझा रस्ताच मोकळा केला म्हणावयाचा. मला आतां एका देशसेवेपेक्षां

कशाचीही पर्वा उरली नाहीं. वाटेल तितकी स्वतः झीज सोशीन, मदत मिळवीन, हवें तें करीन पण ज्या दुष्टानें माझ्या गरीब लोकांस त्राही त्राही करून सोडिलें आहे त्या निमक हराम नागेशाची तर पायमल्ली करीन. वैर, वैर, हा शब्द माझे अंतःकरणांत निरंतर जागृत राहील. त्याचा अतिरेक होऊन नाग्याची राखरांगोळी उडवील तेव्हांच तो निघेल. ( जरा विचार करून ) वेड्याप्रमाणें हें मी काय बोलून दाखवीत आहें ! मजजवळ नाहीं तूर्त पैसा. नाहीं कोणी मित्र. काय ! माझे नशिबी भिक्षा आहे कां पूर्वी पेक्षां जास्त चांगले दिवस यावयाचे आहेत, समजत नाहीं. पण तूर्त तर माझे हाल कुत्रा देखील खाणार नाहीं. कारण या वेळेस माझी स्थिति ह्मणजे—:-

पद. ( चाल—जांत कीं मम शकुंतला ही. )

हीच क्षुधा मज त्रास देतसे दुःखहि सोसेना ॥धृ०॥
अन्न मिळेना वारि दिसेना उपाय चालेना ॥
घोर श्रमानें श्रांताचि झालों पदही उचलेना ॥
बाळपणीं मी जरि कधिं मरतों तरि हें घडतेंना ॥
पुढच्या त्या आशेवर मजला धीरही धरवेना ॥

( पुनः इकडे तिकडे फिरून ) पहा ! काय हा चमत्कार ! ईश्वरा तुझी लीला अगाध आहे. मी भुकेनें व तृषेनें व्याकूळ झालों असतां मजला—

पद. ( अंजनी गीत. )

फिरतां सहजचि वारि मिळालें ॥
आम्र वृक्ष हे सफल लाधले ॥

पाहुनि यातें शांत जाहलें ॥
मन माझें आतां ॥ १ ॥

तर आतां याच ठिकाणीं भुकेचें व तृषेचें निवारण करावें हें बरें. ( बागेंत एकीकडे बसतो. )

कमला—( स्वगत ) आज सकाळीं माडीवरच्या खिडकींतून यांनां पाहिल्यापासून मन कसं चमत्कारिक व उतावीळ झालं आहे. मनाचा धर्म बाई किती तरी विलक्षण ! पहा—

पद. ( चाल—बंजारा. )

हा शूर दृष्टिगम झाला ॥ तैं काम तप्त करि तनुला ॥
कधिं वाहिन काया याला ॥ जाहलें असें कीं मजला ॥
हा स्पष्ट मदन कीं गमला ॥ परि कसा दुःस्थळिं आला॥
परि मनीं धैर्य बहु धरुनी ॥ इथवरी आलें धावोनी ॥ चाल॥
न्याहाळून त्यास पहावें । सन्निध जावें । आलिंगन द्यावें ।
परि मन घे बहु भीतीला ॥ १ ॥

आज माझं मन जें त्यांचेकडे धांव घेत आहे त्यावरून त्यांचेच-पाशीं जन्माचा संबंध घडवून आणण्याचें ईश्वराचे मनांत आहेसं दिसतं. या एकांत स्थितीचा मला बाई कंटाळा आला आहे, तर हा योग जुळून आल्यास किती छान होईल ह्मणून सांगूं- ( न्याहाळून पहाते )

पद. ( चाल—नृप मन कठोर० )

मदनशर उरांत भल्लचि मारी ॥ धृ० ॥
मंदस्मित मुख । नीरज लोचन । रत्नमणिक बहु धारि ॥

कुंदरदनयुत शुभ्र वसन हा। रत्नमाणिक शिरिं भारि॥
स्वरुपें केवळ रतिपति भासत। होवो पति निर्धारि॥१॥

कांही होवो, धैर्य धरून भेट घ्यावीच. भेट घ्यावी ह्मटलं खरं पण मागच्या त्या प्रसंगापासून आजन्म अविवाहित राहीन अशाबद्दल केलेली प्रतिज्ञा फुकट जाणार कीं काय! माझा तरी काय इलाज आहे! या पुरुषाला पाहिल्यापासून—.

पद. ( चाल—तस्करा हातीं० )

नयनीं माझ्या ॥ हाचि सुंदर भरतो ॥
मोद मना किति होतो ॥ ध्रु० ॥
शीतळ वारा ॥ तरु पासुनि येतो ॥
दुःखित मना शांति देतो ॥
तेवि हा मातें ॥ सौख्य तरु गमतो ॥
ईश्वर कीं आज पावतो ॥
देखुनि यातें ॥ निश्चय हा ढळतो ॥
विवेक तिळही ना उरतो ॥

( पुढें होऊन माधवरावास ) महाराज, आपण कोण व कोठील हें ऐकण्याची इच्छा आहे.

माधव०—अति तृष्णेमुळें जल शोधार्थ हिंडत असतां या ठिकाणीं येऊन पोहोंचलों, तेव्हां परवानगीवांचून आल्याबद्दल रोष नसावा. तसेंच आम्रवृक्षावरील कांहीं फळेंही मी क्षुधा निवारणार्थ तोडिलीं त्याबद्दल क्षमा मागतों.

कमला—इश्य, कांहीं तरीच. क्षमा मागण्यास आपण असं त्यांत काय केलं आहे! पुरुषांनीं का बायकांची क्षमा मागायची

असते ? पण या ठिकाणीं परवानगीवांचून येण्याची सक्त मनाई असल्यामुळें आपणावर कदाचित् एखादं संकट येण्याची मला किनई फार भीति वाटते.

**माधव**०—मजबद्दल भीति ! भीतीसंबंधानें गोष्टच तूं काढलीस म्हणून आतां तुझी हकीकत समजून घेण्याची मला विशेष उत्कंठा लागली आहे. तेव्हां एकंदर उलगडा झाल्याशिवाय येथून तर आतां मुळींच न जाण्याचा मी विचार केला आहे.

**कमला**—ऐकावं तर—

पद. ( चाल—आजि शेवटचा० )

**अति थोर कुळीं मजला विधिनें केलें ॥**
**उत्पन्न परी तें फसलें ॥ धृ० ॥**
**जव मी पूर्णपणें युवति दशेप्रति आलें ॥**
**मजवरि हें संकट पडलें ॥** चाल ॥
**परि दुष्टा नच वश झालें ॥**
**दुर्दैव पूर्ण ओढवलें ॥**
**जरि घ्याल तुह्मी अबलेसी या पदरीं ॥**
**दुर्दिन ते खचितचि गेले ॥** १ ॥

तेव्हांपासून मी या रामपूर संस्थानच्या बंदिखान्यांत मोठ्या कष्टानें दिवस काढीत आहें. व मला हल्लीं या स्थितीचा कंटाळा येऊन त्यांतून आपण मला मुक्त कराल या आशेनें आपणाकडे धांव घेतली आहे, तर मनांत कांहीं शंका न ठेवितां आपण कोठील व ह्या ठिकाणीं कसे आलांत वगैरे सर्व हकीकत कळवाल तर मजवर मोठे उपकार होतील.

माधव०-( स्वगत ) काय हें सौंदर्य ! मला तर असें वाटतें कीं, ज्या भाग्यवान सुंदरास ही—

पद. ( चाल-अर्ध तनु वारुळीं० )

नक्षत्रतुल्य शुभ्र वसना प्राप्त ज्यास धन्य साची ॥
शोभे उपमा शशिला किरणाची ॥ धृ० ॥
मेघ मंडळीं दिपवित जना चपला ती जशी ॥
वाटे मज अन्य अप्सरा उर्वशी ॥
नाना परिचे तरंग उठती देखुनि मन्मनिं हिसी ॥
मनुजा पाडि भूल ही कशी ॥ चाल ॥
काय हिचें रूप मनोरम दिसतें ॥
मदनाची समशेर जणूं गमते ॥
पाहाया उत्सुक मन्मन तें भ्रमतें ॥
सुंदरि लाभा प्रभुवर घडवो इच्छा ही साची ॥
सुंदरा नसे हिज परती दुजी ॥ १ ॥

खरोखर एकांतवास व परवशता ह्यांस ही कंटाळलेली दिसत आहे. काय चमत्कार पहा ! पूर्वींचा अर्थाअर्थी संबंध किंवा परिचय नसतांना एकमेकांस इतकें वेड्यासारखें कां बरें व्हावें ! हिजकडे पाहिल्याबरोबर-

पद. ( चाल-मन मजला वाहिलें० )

सुखवीतो बहु मला ॥ अक्षिभल्ल हा
रुततो परि मज । सुखवीतो बहु मला ॥
कदलीसम या तरू शोभती ॥
शरचंद्रसम वदन कांति ती ॥ १ ॥

असो हिची इच्छा निवळ सुटकेसाठींच असली तरी हरकत नाहीं, मला हिचें दुःख दूर केलें पाहिजे. ( उघड ) हें पहा ! धारा नगरीचे संस्थानिक रंगराव बाबासाहेब यांचें नांव ऐकून माहीत असेल, तथापि मी सांगतों—

दिंडी.

अमित पुण्यार्जित वृत्ति होति ज्यांची ॥
कीर्ति मिळवीली बहुत खचित साची ॥
तनय माधव मी जाण असे त्यांचा ॥
दैवयोगें पातलों येथ साचा ॥

कमला—( स्वगत ) भाग्य कधीं उदयास येईल तें खरं. ( उघड ) महाराज आपणास आतां येथें उभे राहिलेले पाहून मला फार भीति वाटते. कारण ह्या राजाचे परवानगीशिवाय कोणासही येथें राहण्याची मनाई आहे, मग माझ्याशीं बोलणारावर किती भयंकर—केवळ प्राणावरचाच—प्रसंग येईल, हें निराळें सांगणें नको. यासाठीं—

पद. ( चाल—पंचप्राण तुजवर हे० )

सूज्ञ नरा तव चरणीं विनति मी करी ॥
घेउनियां पदरिं मला संकटा हरी ॥
करुनि कृपा दासिवरी परत जा त्वरें ॥
यांत तुझा मजलाही होय कीं बरें ॥
संगम तव सुखकर हा जरि कधीं घडे ॥
तव सुरुपीं मन माझें सर्वथा जडे ॥

माझी सुटका झाली नाहीं तरी बेहेत्तर आहे, आपल्या जिवाच्या

भीतीसाठीं म्हणून सांगतें कीं, पहारेकऱ्यांनीं पाहण्यापूर्वी आपण येथून निघून जावें व साधल्यास दासीसाठीं—

पद. ( चाल-सुवर्ण केतकी० )

भूपति सदनीं जाउनि राया साधा सुटकेच्या उद्यमा ॥
नीच दुष्ट तो माजी नृपति गेला कळतें निजधामा ॥
तयामागुनी राजपदावरी बंधु तयाचा तो बसला ॥
रामराव हें नाम तयाचें गमतें भूपण या महिला ॥
वृत्तांतातें परिसुनि माझ्या येइल करुणा रायाला ॥
म्हणुनि प्रार्थितें त्वरा करुनियां साधावें म्हणि कार्याला॥

माधव०-(स्वगत ) हिच्या चेहऱ्याकडे बारिक दृष्टीनें पाहिलें असतां हिचें अंत:करण मनोविकारांनीं खळबळून गेलें आहे अशाबद्दल खात्री होईल. परतंत्रता मोठी कठीण असते, यांत संदेह नाहीं. खरोखरच जबर व्यथेनें हिला घेरलें आहे. ( उघड ) ठीक आहे. :असें करण्यापासून तूं काळजीमुक्त होत आहेस, तर कितीही संकटें आलीं तरी मी मागें फिरणार नाहीं. समजलीस ? आतां एवढेंच सांगतों कीं—

पद. ( चाल-सज्ज करुनि चाप० )

भीउं नको स्वमनिं आतां खचित सुंदरी ॥
कारागृहवासमुक्त करिन आदरी ॥ ध्रु० ॥
जाउनिया भूप सदनिं । प्रार्थिन त्या दीनपणी ॥
सत्यपणा मद्वचनीं । ठेवि अंतरीं ॥ १ ॥
प्रेम तरू लावियला । छेदु नको परि त्याला ॥
आज्ञा दे मज जाया । शोक आवरी ॥ २ ॥

कमला—मजबद्दल शंका असल्यास महाराज—

पद. ( चाल—ही प्रखर मुद्रिका० )

सुवर्ण मुद्रिका घ्या तरिं आतां तोष असूं द्या पूर्ण मना ॥
दुःख विसरतां सौख्य घडतसे मानव न्याया सकलांना ॥
मान्य करावी माझी विनती विसरुनि अवघा दोषपणा ॥
पदरीं घ्यावें दासीसी या अंतरिं ठेवुनि शांतपणा ॥ १ ॥

( आंगठी माधवरावाचे बोटांत घालते व जाते. )

माधव०—असो हिची भेट ह्मणजे अर्थात ज्या दुष्टानें माझ्या भाग्यावर गदा उपसली आहे त्याचा प्रतिकार करण्यास मला जास्तच उत्तेजन देणारी आहे. वाः ! काळा तुझा प्रभाव तरी किती वर्णन करावा !—

पद. ( चाल—नारी नजर तुझी गहिरी० )

काला जबर तुझी करणी ॥
कालचक्र फिरतां, उलटचि होतें, राव रंक न मानी ॥
सुयश प्राप्त मला व्हाया ॥
झिजविन चंदनपरिं देहा ॥
सिद्धचि संकट सोसाया ॥
हेतू सिद्धिस्तव करीन सर्वहि जागुनि विवेक मनीं ॥

( जातो. ) ( पडदा पडतो. )

## अंक तिसरा समाप्त.

# अंक ४ था.



## प्रवेश १ ला.



स्थळ–अरण्य.

पात्रें–स्वामी सत्यानंद व माधवराव.

**स्वामी सत्यानंद**–ज्ञानी पुरुष काय ह्मणतात–

पद. ( राग–कालंगडा. )

प्रभुचरणीं मन लावा। सुजनहो ॥ मन लावा ॥ धृ० ॥
षड्रिपु मर्दुनि। हंकृति सोडुनि। सज्जनसंग धरावा॥१॥
मायिक जगतीं। व्यर्थ भुलोनी। कां करितां नरसेवा॥२॥
अमोल नरतनु। पुन्हा मिळेना। घ्या नामामृत मेवा॥३॥

जगाच्या भावी स्थितीकडे लक्ष दिलें असतां फार वाईट वाटतें. लोक पुण्यहीन झाले आहेत. त्यांना भलभलते आचार आवडूं लागले आहेत. सत्याची गोष्ट निघाली कीं तिकडे पहातसुद्धां नाहींत. ईश्वराविषयीं चिंतन तर त्यांस माहीतच नसतें. परंतु प्राण्यास आसन्न मरणकाळीं काय काय विचार उत्पन्न होतात ते पहा—

पद. ( चाल–अर्ध तनु वारुळीं० )

सुखोपभोगामाजि न कळतां काळ किती लोटला ॥
अकल्पित काल कसा पातला ॥ १ ॥
संसृतिचा हा सर्व पसारा अटपायातें मला ॥

अवसर तो न मुळीं राहिला ॥ चाल ॥
मज ठाउक असतां मिथ्या ही संसृती ॥
परि मोहबळें मी धरिलीसे शाश्वती ॥
समजुनि उमजुनि अखेर फसलों काय ह्मणावें मला ॥
मतिला भ्रंश खचित जाहला ॥ १ ॥
बहु दिवसाच्या सांनिध्यानें स्नेह असे वाटला ॥
कुडीतें प्राण प्रिय जाहला ॥
वियोग दुःखें क्लांत होउनी खेद मना वाटला ॥
अहा कीं प्राणप्रिय चालला ॥ चाल ॥
परि वाटत आतां व्यर्थ आयु खर्चिलें ॥
परमार्थ साधनीं केविं न तें अर्पिलें ॥
ईशनाम तें ध्याया बघतों परि न घेववे मला ॥
बहू हा दूत करी घाईला ॥ २ ॥
दारा सुत हे धरिति भरंवसा कसा फसवुं त्यांजला ॥
सोडुनि ह्मणति कुठें चालला ॥
होणारचि तें मुळीं चुकेना खंत न त्याची मला ॥
ईशा राखि सुखी त्यांजला ॥ चाल ॥
हा प्रसंग ऐसा अवचित कोणावरी ॥
यावा न कदापि असला स्वरिपु जरी ॥
भार तयांचा असें तुजवरी हेंचि सांगणें तुला ॥
झालों आतां मी मोकळा ॥ ३ ॥

माधव०–( स्वगत ) वाहवा ! स्वामीमहाराजांची बोधपर वचनें ऐकून कोणास बरें आनंद होणार नाहीं ! ( उघड )

स्वामीमहाराज ! ह्या जिवास त्रासून गेलेल्या मला संग्रहीं ठेवून उपकारबद्ध कराल तर मी आपला फार आभारी होईन.

**स्वामी सत्यानंद**—काय हें अज्ञान ! लोक किती वेडे व अज्ञानी कीं देह नाशवंत आणि आत्मा अविनाशी अशी वास्तविक स्थिति असतां देहालाच आत्मा ह्मणतात. अहो—

पद. ( चाल—निजरुपीं जगदाकृतिभासा० )

दुःखद या माया मोह फांसा ॥
गुंतुनि नर ते करिती विलासा ॥
विषयांधें विषय सेऊनि ॥
अविनाशी ह्मणती देहा कैसा ॥ ध्रु० ॥
काम रिपु हा मत्ताचि भारी ॥
अधर्माचा त्यां घाली फांसा ॥
माया डोहीं बुडवायाला ॥
शत्रू तो बहु तमजसा ॥ १ ॥

माधवा ! तूं असा जिवास त्रासून कसें चालेल ? तूं बाहेर कां व कसा निघाला आहेस ही सर्व हकीकत मला समजली आहे. तुजकडून अद्यापि बरींच कार्यें घडावयाचीं आहेत. प्रयत्न आपला सुरू ठेवावा, यश देणार परमेश्वर आहे. तेव्हां त्याचे स्मरण मात्र ठेवित जावें. कारण—ह्मटलें आहे—

पद. ( चाल—विठाबाई माउली० )

नानापरिच्या रूपें हरि तो दीनोद्धारा करी ॥
सगुणाभ्यासें आह्मा लाभें निर्गुण मूर्ति खरी ॥

अंत न लागे त्या लीलेचा अनंत नामा धरी ॥
नित्य मानसीं चिंतन त्याचें सदासर्वदा करी ॥

माधव०—तें खरें. पण महाराज ! हें जग लबाड्या, चोऱ्या, चाहाड्या, खून, दंगे, एकमेकांचीं वर्में काढणें, मोठा असा गर्व वाहणें वगैरे गोष्टींनीं पूर्ण भरलेलें आहे ह्मणून त्या मार्गांत पुन्हा राहणें प्रशस्त वाटत नाहीं.

स्वामी—

पद. ( चाल—वीर शिरोमणी० )

षंढापरिस तूं काय वदासि हें योग्य न समयाला ॥
आयुष्यर्थ जाय विलयाला ॥ धृ० ॥
संकट समयीं हताश होतां वदसी वचनाला ॥
परिणामीं बोलसि दैवाला ॥ चाल ॥
ह्मणुनि सुचवितों कर्तव्यातें स्मरा ॥
तरिच अवनति जाइल माघारा ॥
युक्तिच्या पथें मार्ग शोधुनि स्वार्थ करावा भला ॥
ह्मणविसी तूं मग भला भला ॥ १ ॥

तेव्हां मी सांगत आहें असेंच कर.

माधव०—आज्ञा प्रमाण.

स्वामी—

पद. ( चाल—उत्तम जन्मा० )

प्रपंच करुनी परमार्थचि तो सूज्ञें साधावा ॥
भक्ति ज्ञान वैराग्य धरुनी कैवल्याचि ध्यावा ॥

उषःकाळिं तो मार्जनादि विधि सर्वहि सारावा ॥
स्नान करूनी वाडवडिला आदर तो द्यावा ॥
गोब्राह्मण प्रभू दर्शन घेउनि आशिष तो घ्यावा ॥
संपवुनि महायज्ञ यथा विधि याचक लक्षावा ॥
पुरवुनि त्यांची इच्छा सर्वहि विवेक जागावा ॥
अलक्ष वस्तुवरि लक्ष ठेवुनि योगचि साधावा ॥

त्याचप्रमाणें विषयाची इच्छा धरूं नये, परकल्याणासाठीं रात्रंदिवस झीज सोसावी, अहंकार सोडावा, दुसऱ्यानें केलेली निंदा सहन करावी, सर्वांशीं सरळपणानें वागावें, इष्ट किंवा अनिष्ट कसाही प्रसंग असला तरी चित्तवृत्ति नित्य सारखी ठेवावी, आणि सर्वदा अंतर्यामीं ईशस्तवन करीत जावें. कारण ह्मटलें आहे कीं—

पद. ( कैसा जोग कमायारे० )

तयाचें जन्म सफल झालें ॥
जयाचे मुखीं नाम आलें ॥ धृ० ॥
ज्यानें टाकुनि सकल विकारहि । चित्तस्तंभा केलें ॥
अनिवार ओढाळ मनातें । ईशचरणिं नेलें ॥ १ ॥

बरें, पण या आड मार्गाला कोणीकडे आलास ?

माधव०—महाराज ! राजधानीचा मार्ग दाखविण्यास कोणी सांपडेल या आशेनें फिरत असतां आपलें प्रेमभरित ईश्वरचिंतन ऐकून येथें आलों. आपण कृपावंत होऊन मजला सांगितलेल्या ज्ञानाबद्दल फार आभारी आहें. आपली अमृततुल्य वाणी कितीही ऐकली तरी पुरेशी वाटत नाहीं.

**स्वामी**—ठीक आहे, असाच समोर उत्तरेकडे गेलास ह्मणजे राजधानी दिसावयास लागेल. जा आतां आपल्या उद्योगास लाग.

( जातो. )

---

## प्रवेश २ रा.

स्थळ—सभा.

पात्रें-विनायकराव, भास्करराव, बळवंतराव, गोविंदराव, त्रिभुवनशेट, देशमुख व शहरांतील इतर मंडळी.

**विनायकराव**—सद्गृहस्थहो ! शहरांतील कांहीं प्रमुख मंडळीच्या सूचनेवरुन आज आपणांस मुद्दाम येथें येण्याची तसदी दिली आहे, याबद्दल माफी असावी. आतां पहिल्यानें सभेचा कार्यक्रम सुयंत्र तडीस नेण्यास आपणास अध्यक्षाच्या जागेवर कोणीतरी योग्य मनुष्याची नेमणूक केली पाहिजे. माझे मतें आजचें अध्यक्षस्थान रावबहादूर बळवंतराव भानू यांनीं स्वीकारावें.

**भास्करराव**—जर ह्या ठिकाणीं अध्यक्षस्थान स्वीकारण्यास कोणी योग्य गृहस्थ असतील तर यांत माझे मित्र विनायकराव यांणीं सुचविल्या प्रमाणें रावबहादूर भानू हेच आहेत. त्यांची स्वदेशप्रीति, स्वार्थत्यागबुद्धि व बांधवांवरील अलौकिक प्रेम, हे गुण अवर्णनीय आहेत. आमच्या सूचनेचा अनादर ते करणार नाहींत अशी आशा आहे.

( बळवंतराव अध्यक्षस्थानीं बसतात. )

**विनायकराव**–परस्परांचें सुखदुःख परस्परानें ऐकून होतां होईल तों, झाल्यास त्याचें निवारण करणें हें प्रत्येकाचें आदिकर्तव्य आहे. आज आपण आपला सुखाचा व दुःखाचा –विशेषें करून दुःखाचा ह्मटलें असतां चालेल– धडा वाचण्यास जमलों आहों, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. आपले मायबाप आण्णासाहेब संस्थानाधिपति यांचे हातून होत असलेल्या चुकांबद्दल सर्वांस त्रास व दुःख सोसावें लागत आहे. उदाहरणार्थ, आज काय मला त्रास दे, उद्यां नारायणराव यांस अन्यायानें बंदींत टाक, परवा काय त्रिभुवनशेट मारवाडी यांचे कडून पैसा जुलमानें काढ; अशाच प्रकारचे घाणेरडे धंदे ते व त्यांचे अनुयायी यांजकडून वारंवार घडून येत आहेत. याबद्दलचा बंदोबस्त सरकारकडे ओरड नेल्यास तावडतोब होण्यासारखा आहे हें खरें, व त्याप्रमाणें आपणांपैकीं बरेच जण तिकडेस जाणार असल्याचेंहि समजतें. परंतु सद्गृहस्थ हो! तसें करण्याचें मुळीं स्वप्नांत सुद्धां आणूं नका. कारण आजपर्यंत ज्यांनीं आपणास चांगले रीतीनें वागविले त्या रंगराव बाबांचे तरी आपण थोडे बहुत उतराई झालें पाहिजे ना? आपण वर ओरड नेलीत ह्मणजे अर्थातच आण्णासाहेबांचे हक्कास धक्का बसेल; मग आपण यांत कीर्ति ती काय मिळविली! त्यांचेच कृतीनें संस्थानास उतरती कळा लागली असें ह्मणाल हें खरें. परंतु याचें अंशतः खापर आपल्या प्रत्येकाचे शिरावर नेहमीं बसेल, याचा विचार करा. ते आपले मालक व आपण त्यांचे चाकर. आज ते त्रास देतात तेच आपणास उद्यां पोटाशीं धरतील, हें लक्षांत असूं द्या. आपले हक्क व अधिकार आपण न संपादन केले तर मग आपलें मनुष्यत्व काय? तुह्मी मात्र जरा धीरच धरला पाहिजे. दिवसमान पाहिला पाहिजे. तुह्माला जर

तुमच्या जन्मभूमीची स्थिति कळून कीव येणार नाहीं तर कोणाला येणार ? देशाला लागलेल्या उतरत्या कळेचा विचार केला पाहिजे. अकलेच्या जोरावर कार्य साधलें पाहिजे. बुद्धि चालवून आपण कोठें चुकतों आहों हें पाहिलें पाहिजे, तरच आपली चूक दुरुस्त होऊन, गेलेलें ऐश्वर्य पुन्हा प्राप्त होईल. गमावलेलें स्वातंत्र्य, नष्ट झालेलें शौर्य, सांडलेलें धन व घालविलेलें आर्यत्व हें सर्व पुन्हा मिळेल. मात्र लोकांनीं नीट विचार करून पाहिलें पाहिजे. हरप्रयत्नानें आपण आण्णासाहेबांस चांगल्या मार्गावर आणून आपलें कल्याण त्यांचेच हातांनीं करून घेऊं. आज आपल्या दुर्दैवानें माधवराव येथें नाहींत, असते तर लवकरच बंदोबस्त झाला असता. त्यांचे संबंधानें आपण सर्व आश्चर्यचकित असाल यांत शंका नाहीं. एवढेंच सांगितलें असतां मला वाटतें पुरें होईल कीं ते सुखरूप आहेत. या साठीं ते येईपर्यंत आपण स्वस्थ असावें, हेंच माझें सांगणें आहे. कां, देशमुख ! मी ह्मणतों असेंचना ?

**देशमुख**–होय रावसाहेब, असेंच केलें पाहिजे. सार्वजनिक हितासाठीं आह्मी हटणारे ग्रहस्थ नव्हे. वाटेल तशी झीज सोसूं पण नांवाला व कुतीला कलंक लागूं देणार नाहीं.

**विनायकराव**–होय, बरोबर बोललांत. कां त्रिभुवनशेट ! अपला कसा काय विचार आहे ?

**त्रिभुवनशेट**–नही रावसाहिब ! आपासूं एडो नुकसान नही सहीजे. मारी एक दमडी गमजावे तो सारीरात नींद नही आवे. तो पछे इत्तो मोटो कांकर सहिजे ये आपीच कहो ! हो मारवाड सूं आवती वखतलारे लोटो डोरीलेर आयोने धन दोरो घणो कमायोडो है. जिकेसूं पेटमे पण पूरण खावा नही,

कंईनें दौंपण नई. जादो खरच पण करो कोयनी, तो पछे फासूरो गमावणनें किठे छे.

**विनायक०**–तुमच्यावर जुलूम झाला, तुमचा पैसा जबरीनें नेला वगैरे सर्व खरें पण सार्वजनिक हिताहिताचा संबंध लक्षांत आणा. प्रसंग पाहूनच सर्व गोष्टी केल्या पाहिजेत.

**त्रिभुवन**–म्हारो पिसा जीकेसूं बचावे सोही चोखा प्रसंग हय. अपनें तो ए बात आछी कोनी लगे.

**देशमूख**–या मारवाड्याची कशाला खुशामत करतां रावसाहेब ! करूं द्या याला वाटेल तें. पाहून घेऊं, जाऊं तर द्या याला!

**त्रिभुवन**–( रागानें ) क्या कहो बापू जावण दो ? जावांगा नही तो छोडांगा कांई. पीसा फासूरा हाय ! थानें बेठो बेंठोनें फासूरा मिळ जावे. पण म्हाने तो प्राण ज्युं छे. प्राण जावे तो फिकीर नही पण पैसा गमाकर थांदाई नागा होय बैठू के ?

**विनायक०**–शेट, तुम्ही ऐकत नाहीं यास इलाज नाहीं; पण खूप लक्षांत असूं द्या कीं, तुम्हाला यांत यश येणार नाहीं. एवढेंच नव्हे तर येथें राहणेंही तुम्हांला फार जड जाईल. तर याचा विचार करून काय करणें तें करा.

**त्रिभुवन०**–( आपल्याशीं ) ह्मारासूं ये बात बुरी भई. ए सगळरो एकमत होयो दीशे पासो आपणा एकलेरो क्या जोर चालशी तो अबार एरेच मत चालणूं. नही चालणूं तो कई करूं. चालणोई भाग ! ( उघड ) ए रावसाहिब ! ह्मे पहिले अछातऱ्हेसे सुणाकोयनी. और दुसरी बात ह्मारा नुकसाण बहोत हुवा हय जिकपु मारेसे बोले बिगर रह्याकोनी. ( हात जोडून ) ह्माने खमा करो. हूंतो थांरो ईज हो. कया सुणीयो माफी करजो थे कयसे ज्यांईश करीश.

**विनायक**—असे रस्त्यानें बोला शेट. बरें, दुसरे कोणास याबद्दल सांगणें असल्यास सांगावें.

**गोविंदराव**—आजच्या सभेचा उद्देश रा. रा. विनायकराव यांणीं कळविलाच आहे. आतां फक्त खालील आशयाचे तीन ठराव पास करण्याबद्दल माझी सूचना आहे ते ठराव असे:—

१. माधवराव यांस जाऊन पंधरावर दिवस झाले, अजून परत आले नाहींत. यावरून आपण होऊन ते येतील असें दिसत नाहीं. यासाठीं भास्कररावचे मदतीस शंकरराव यांस देऊन त्यांचे शोधार्थ पाठवावे व त्यांणीं त्यांस घेऊन यावें आणि--

२. तोंपर्यंत इकडे विनायकराव व स्वतः अध्यक्ष साहेबांनीं शहरांतील सर्व लोकांस कोणत्याही गोष्टीपासून त्रास होणार नाहीं याबद्दल काळजी बाळगून आण्णासाहेबांस नीट रीतीनें वागण्याबद्दल सांगण्याचा झटून प्रयत्न करणें व संस्थानांतील कामगार, बडी मंडळी, अधिकारीवर्ग व इतर पोलीस ऑफीसर यांस स्वतःचे वजनानें व युक्तीनें आपल्या गुप्तसभेची हकीकत समजावून सांगून संस्थानचे कल्याणासाठीं आपल्या ह्या चाललेल्या खटपटीस त्यांचे अंतस्थ पूर्णपणें साह्य मागणें. शिवाय—

३. माधवराव आल्यावर अगर ते इतक्यांत येणार अशा संधीस सभेची तयारी ठेवणें व आण्णासाहेबांस— तोंपर्यंत ताळ्यावर नच आले तर—कारभारी नागेशराव यांस काढून कारभार माधवरावाचे स्वाधीन करण्याबद्दल भाग पाडणें.

सदरहु प्रमाणें तीन ठराव आपले पुढें मांडले आहेत. मर्जीप्रमाणें तजवीज करतील.

**बळवंतराव**–सदरहु ठरावाबद्दल कोणाचा मतभेद असल्यास कळवावें.

**सर्व**–नाहीं. मुळींच नाहीं.

**बळवंत०**–विनायकराव यांणीं मला बोलावयाजोगें कांहीं ठेविलें नाहीं. त्यांच्या सर्व सूचना उपदेशास्पद असून यथार्थ आहेत. जर आपणांत मनुष्यत्व असेल, जर कांहीं यत्किंचित्ही अभिमान जागृत असेल तर हल्लींचा त्रास मुकाट्यानें सोसाल, इतकेंच नव्हे तर मोठ्या आनंदानें आण्णासाहेबांस ताळ्यावर आणण्यास मला मदत कराल. गोविंदराव यांणीं पुढें आणलेले ठराव योग्य आहेत. तथापि यांत एक चवथा ठराव सर्वांचे अनुमोदनानें घालावा व तो आण्णासाहेबांकडेस पाठवावा, अशाबद्दल मी शिफारस करितों. तो ठराव असा–

४. सांप्रत आण्णासाहेबांचे हातून होत असलेल्या चुकांबद्दल भोगावा लागणारा त्रास असह्य झाला आहे, हें खरें. तथापि आणखी कांहीं दिवस सुधारण्याची वाट पाहून नंतर वरिष्ठाकडे दाद मागण्यास जावें असें ह्या सभेंत सर्वानुमतें ठरलें आहे.

**विनायकराव**–ठीक आहे. झाल्यास याबद्दलचा योग्य परिणाम होईलही.

**भास्करराव**–आजच्या सभेचें काम संपलें. विनायकराव यांणीं सांगितलेली हकिकत लोक घरीं गेल्यावर विसरणार नाहींत, ही दृढतर आशा आहे. शेवटीं बळवंतराव भानू यांचे अध्यक्षस्थान स्वीकारल्याबद्दल आभार मानून मंडळीस तसदीची माफी मागतों.

(पडदा पडतो. सर्व जातात.)

---

## प्रवेश तिसरा.

स्थळ–राजवाडा.

पात्रें–माधवराव व रामराव.

**रामराव**–माधवराव! प्रत्यक्ष आपल्या शत्रूवर देखील आपण चाहतों कीं, जे प्रसंग येऊं नयेत ते तुह्मांवर आलेले ऐकून फार खेद होतो. चांगले वाईट हे प्रसंग सर्वांवर येतातच. सर्व दिवस सारखे कधींही जात नसतात. तथापि तुमच्याइतका भयंकर प्रसंग कोणावर क्वचितच आला असेल. असो. तूर्त तुह्मीं मजजवळ स्वस्थ रहा. हळुहळु तुमच्या इच्छेप्रमाणें तुमच्याच हातून तुमच्या कारभाऱ्यांची खोड जिरवीन. दुसरें! कमले संबंधानें तुमचें काय मत आहे, तिजबद्दल सांगितलेली हकीकत मला निदान संभवनीय वाटत नाहीं. स्वभावानें अति मानी असून तशीच ती हट्टीही फार आहे. तेव्हांच जर ती आमच्या वडील बंधूच्या इच्छेप्रमाणें वागती तर तिला हा तुरुंग व असा प्रसंग कशाला प्राप्त झाला असता? आजला ती खुशाल ऐषआरामांत लोळत पडली असती. ती स्वभावानें जात्याच दुष्ट असावी असें वाटतें. निवळ मूर्खपणानें स्वतःचे पायावर तिनें दगड पाडून घेतला ह्मणावयाचा. याठिकाणीं तिला कांहीं कमी कां झालें असतें?

**माधव०**–तिजकडे पाहिल्याबरोबर जी एकप्रकारची कळकळ उत्पन्न होते त्यावरून आतांतरी तिचा स्वभाव कायम राहिला असेल असें मला वाटत नाहीं.

**रामराव**—काय सांगूं तुह्माला! अजून भ्रमच आहे वाटते? दादांनीं कायकाय खटपटी केल्या, पण सर्वच निष्फळ! आणि सरते शेवटीं तर—

पद. ( चाल-पांडु कुमारा० )

कोंडुनि ठेविली जरि त्या काननीं ॥ ती साध्य न झाली ॥
नकळे कमला कशी एकाकीं तुज वश ये कालीं ॥ धृ० ॥
काय साधनें योजियलीं त्वां त्या रमणीसाठीं ॥
श्रवणीं पडूं दे तीं या समयीं सांगा गुज गोष्टी ॥ १ ॥

माधवराव-

पद. ( चाल-वरील. )

हिंडत असतां काननांत त्या दृष्टीपथीं आली ॥
विशाल वापी वेष्टित तिजवरी नाना तरु वल्ली ॥ धृ० ॥
मानुनि चित्तीं श्रांतस्थल तें उदका सेवाया ॥
दिसला तेव्हां अवचित मजला मार्ग असे जाया ॥ १ ॥

नंतर आंत गेल्यावर-

पद. ( चाल-थाटमाट० )

उपवन तें कितिक रम्य तव मि पाहिलें ॥
आम्र शिरीषादि वृक्ष सुष्ठु शोभले ॥ धृ० ॥
फलभारें नम्र होति वृक्ष भूवरी ॥
पुष्पगंध युक्त वायु सुटत तोंवरी ॥
कुसुम कृष्ण भ्रमर गुंग कितिक जाहले ॥ १ ॥

अशा ह्या अनुपम ठिकाणीं दृष्टीस पडणाऱ्या मनोहर सृष्टिसौंदर्यांत मी गुंग झालों असतां, अवचित तिची भेट होऊन सर्व हकीकत समजली. पण आपल्या हुकुमावांचून तेथें राहणें धोक्याचें वाटल्यामुळें मुळींच न थांबतां एकदम आपले भेटीस आलों. आपली कृपा आहेच व ज्या अर्थी ती आहे

त्या अर्थी माझ्या विनंतीचा अनादर होणार नाहीं ही आशा आहे.

**रामराव**–त्या निरपराधी स्त्रीस बंदींत ठेवून मला मुळींच फायदा नाहीं. त्यांतून तुमचे संबंधानें तर परकीपणा नाहीं. माझी पक्की खात्री आहे कीं, तिचा सर्व लाघवीपणा निवळ बंधमुक्त होण्यासाठीं आहे. तिचे ठिकाणीं प्रीतीचा लेशहि माझे मतें संभवत नाहीं. तुमची इच्छा आहे तर जा घेऊन या, माझी बिलकूल हरकत नाहीं. तुह्मी स्वतःच जा असें सांगण्याचें कारण इतकेंच कीं ओळख न देतां मी सांगितलेल्या गोष्टीबद्दल आपली खात्री करून घ्यावी, ह्मणजे पुढें तुह्मांला पश्चात्ताप वाटण्यास कारण नको. दुसऱ्या जरुरीच्या कामामुळें मला आतां तुमच्याजवळ बसण्यास वेळ नाहीं. आजचे दिवस विश्रांती घेऊन उदईक तुह्मी तिकडे जा. मी आतां चाललों.

( जातो. )

**माधव**०–( स्वगत ) सन्मित्रांचे लक्षणासंबंधानें 'पापान्निवारयति योजयते हिताय' असें जें बामन पंडितानीं ह्मटलेलें अक्षरशः खरें आहे. रामराव यांची लहानपणची ओळख, मध्यंतरीं बरेच दिवस अर्थाअर्थी संबंध व भेटहि नाहीं. आज भेट होऊन सर्व हकीकत सांगितल्यावर मजबद्दलची जी कांहीं कळकळ त्यांणीं दाखविली त्याबद्दलची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं. ज्यानें मजसाठीं आपला रामबाग मला अर्पण केला, माझ्या देशांतील लोकांसाठीं मध्यस्ती करण्याचें मला अभिवचन दिलें, कमले संबंधानें माझे विनंतीस मान देऊन मित्रप्रेम प्रगट केलें, त्यांचा मी कोणत्या रीतीनें उतराई व्हावें, हेंच समजत नाहीं. ( जरा थांबून ) कमलेचें तें चंद्रासही लाजविणारें मुखकमल पाहिलें असतां

मन तल्लीन झाल्यावांचून रहात नाहीं. तिचा तो नाजूक बांधा, मृगाप्रमाणें अति चंचल व काळे भोर नेत्र, नम्र व आनंदी भाषण इत्यादि तिजमध्यें असलेल्या गुणांमुळें पहाणारास मोह उत्पन्न झाल्यावांचून राहत नाहीं. पण मजसंमंधानें तिनें दाखविलेली इच्छा वरवर असून केवळ सुटकेपुरतीच असावी असा जो माझे मित्राचा समज तोहि कदाचित खरा नसेल कशावरून ! तर आतां तिला न ओळखतां येईल अशाप्रकारचे पूर्वीपेक्षां जास्त भपकेदार पोषाखानें गेलें पाहिजे. तर आतां जावें. मलातर तिला पाहिल्या पासून असें झालें आहे कीं–

पद. ( चाल–मेघ बिंदु हे टपटप गळती. )

कधिं पाहिन तिज मुक्त जाहलेली ॥
वचनाची तरी सार्थकता झाली ॥ धृ० ॥
उत्सुकता मज कितितरि वाटे ॥
आनंदें ती कधितरि भेटे ॥
घडेल ऐसें तरि मी जगतीं होय भाग्यशाली ॥ १ ॥

( जातो. )

## प्रवेश ४ था.

स्थळ-एक घर.

पात्रें–आण्णासाहेब, मनोरमा, बळवंतराव व दोन शिपाई.

आण्णा०–ज्या प्रियेला पाहिल्यापासून माझे मनांत अवर्णनीय अभिलाष उत्पन्न झाला होता व जिच्यासाठीं आज कित्येक दिवस मी संधी बघत आहे, ती आज सांपडलेली

पाहून मला अतोनात धन्यता वाटत आहे. ह्या लावण्यलतिके मनोरमेस पाहिल्यापासून मला असें झालें होतें कीं–

पद. ( चाल–बाळ्या बुगड्या० )

ही सुंदरी होइल कीं मजसिं कधींतरिं वशिनी ॥
आस धरुनिही काळ कंठितों स्वस्थ मी अनुदिनीं ॥
सुंदरी मूर्ति मदनाची देखिल्यापासुनि नयनीं ॥
अंध मी झालों कांहीं रुचेना झोंप मिळेना रजनीं ॥

( मनोरमेस ह्मणतो )

हें पहा सुंदरी, मनोरमे, तुला माहितच असेल कीं, मी तुजकडे कां आलों ? तुजमुळें माझी किती चमत्कारिक स्थिति झाली आहे ह्मणून सांगूं–

श्लोक.

नाहीं मला चैन सखे कदाही ॥
कामाग्नि माझा तनुलागि दाही ॥
सोडी अतां आज दुराग्रहाला ॥
ये सौख्य भोगार्थ मम गृहाला ॥ १ ॥

मनोरमा–हं, खबरदार चवळपणा कराल तर ! कांहींतरी विचार करा.

आण्णा०–अग विचार कसला ? विचारच करून आलों आहे कीं, आज—

मनो०–पुरे ! पुरे ! पुढें काय बोलावयाचें असेल तें आपल्या जवळ ठेवावें–

पद. ( चाल--कर टाकि सखे गे याकंठीं. )

नच योग्य तुला ही अशि करणी ॥
कशि भीति तुला नच त्या मरणीं ॥ धृ० ॥
आवरूनि मन मूढ गोष्टी ह्या
सोडुनि आतां सर्वहि वायां ॥ लाग प्रभू चरणीं॥१॥

आण्णा०--

पद. ( चाल--वरील )

आजवरि सखये तुज करितां ॥
झुरलों परि कधीं ये नच हातां ॥ होई मम रमणी ॥

मनोरमा--

पद. ( चाल--वरील. )

नच योग्य तुला ही अशि करणी ॥
कशि भीति तुला नच त्या मरणीं ॥ धृ० ॥.

आण्णा०--

पद. ( चाल वरील. )

यास्तव आलिंगन मज देउनि ॥
शिक्षार्थीचि ये सत्वर धाउनि ॥
झणिं चल काम रणीं ॥ १ ॥

मनोरमा--

पद. ( चाल--वरील. )

नच योग्य तुला ही अशि करणी ॥
कशि भीति तुला नच त्या मरणीं ॥ धृ० ॥

तुला सांगून ठेवितें कीं, हें मला बिलकूल खपणार नाहीं. दादा घरीं आल्यावर त्यास सर्व सांगेन.

आण्णा०-काय! त्याला मी जिवंत ठेविला असेल तर ना सांगशील? दुसरें, माझ्या हातून सुटशील तर सांगशीलना? अवकाश आहे!

मनोरमा-

पद. ( चाल-यमुनि उपवना. )

निर्लज्ज्या तव कृष्ण वदन हें दावुं नको मजला
झडो झडोवा जिव्हा तुझिही शापचिहा तुजला॥ धृ० ॥
अशा कृतीनें आयुर्दिन तव आजचि कीं भरला ॥
एकांतीं मज पाहुनि छळिसी सच्छीला अबला ॥
घोर यातना देउनि यम तुज करिलचि शिक्षेला ॥
होउं नकोरे मदांध ऐसा कर तुं विवेकाला ॥ १ ॥

मेल्या दुष्टा! चल निघ येथून.

आण्णा०-येथून नीघ ह्मणतेस. पण आज अधरामृत पान केल्यावांचून कसा निघेन? ( हात धरतो. )

मनोरमा-( त्यास लोटून ) निर्लज्ज्यासारखा येथें येऊन भलभलतें बडबडतोस. तुला अक्कल नाहीं? जातोस कीं नाहीं येथून?

आण्णा०-( रागानें ) ही अशानें कां वठणीस येणार आहे! हिचे पुरे हालहालच केले पाहिजेत. हे अविचारी स्त्रीये, तूं ऐकतच नाहींस तर हो अशी पुढें-( धरण्यास जातो )

मनोरमा-( दूर होऊन )

पद. ( चाल-कुणी दावा आतां० )

कुणी मजला नसे त्राता अशा समयीं ॥
पिता माता सकल बंधु खचित अदयी ॥
छळित भारी ॥ दुष्ट वैरी ॥ जगिं स्वैरी ॥
वचन शर हा ॥ भेद करितो ॥ प्रबल हृदयीं ॥ १ ॥
भवानी भैरवी अंबा महामाया ॥
विशालाक्षी कमलहस्ता सांबजाया ॥
जगज्जननीं ॥ त्रिपुरदहनी ॥ असुरदमनी ॥
कमलगर्भा ॥ शिवाधात्री ॥ महाकाया ॥ २ ॥

मूर्खा ! यःकश्चित विषयासाठीं भंज अबलेवर हात चालवितोस ?

**आण्णा०**-तर मग हो वश नाहींतर पहातों आतां कुठें जाशील !

**मनोरमा**-आई जगदंबे, तूं तरी या दुष्टापासून माझें रक्षण कर. ( पळते )

**आण्णासाहेब**-( तीस धरून ) पळून जातेस काय ! थांब आतां दाखवितोंच मजा तुला.

**शिपाई दोघे**-( त्वेषानें ) हां हरामखोरा ! दुष्टा ! चांडाळा ! मदांधा ! निरपराधी स्त्रीस गांजल्याचें घे हें प्रायश्चित.

( बेहोष होईपर्यंत मारतात. मनोरमा निघून जाते व आण्णासाहेबास राजमार्गावर उचलून टाकतात. )

**बळवंतराव**-( पुढें येऊन ) पहा हो, विषयी जनांची अशीच जेव्हां तेव्हां फजिती उडावयाची. ही स्वारी लंपट होऊन